# राधेय-कर्ण-चरित्र.

लेखक

विनायक सदाशिव वाकसकर.

मुद्रक व प्रकाशकः—

अनंत आत्माराम मोरमकर

श्रीलक्ष्मीनारायण प्रेस,

४०२, ठाकुरद्वार, मुंबई नं० २.

मुंबई.

१९२१

किंमत १ रुपया.

# अनुक्रमणिका.

# प्रस्तावना.



१ महाभारतामध्यें कर्ण ही व्यक्ति प्रामुख्येंकरून वर्णिलेली आहे. परंतु या कर्णाचें सबंद चरित्र असें एके ठिकाणीं मुळींच लिहिलेलें नाहीं. भीष्म, दुर्योधन, द्रौपदी, कर्ण व कृष्ण इतक्यांचीं चरित्रें जर निराळीं स्वतंत्र रीतीनें लिहिलीं गेलीं, तर त्यांपासून मराठी वाचकांचें मनोरंजन होऊन सबंद महाभारताचें वाचन झाल्याचेंही श्रेय त्यांस अल्पायासांत मिळेल.

२ या कर्णचरित्रांत विशेषतः कर्णाचें महाभारतांत जसें चरित्र आहे तसेंच वर्णिलेलें आहे. महाभारताचा काल कोणता, त्यांत मूळचा भाग किती, मागाहून प्रक्षिप्त असा किती, व तो केव्हां प्राक्षेपिला गेला असेल इत्यादि वादग्रस्त विषयांचा यत्किंचितही ऊह केलेला नाहीं. कर्णासंबंधीं जेवढी माहिती मिळाली व कर्णाच्या चरित्रसूत्राला जी उपयुक्त आहे असें वाटलें तेवढी सरळ गोष्टीच्या व संवादाच्या रूपानें या पुस्तकांत घेतलेली आहे. भारतीययुद्ध हें आर्य व अनार्य यांचें शेवटचें युद्ध होतें या महत्वाच्या मुद्यालासुद्धां या चरित्रांत मुद्दामच पुढें आणिलें नाहीं.

३ कर्ण व द्रोण, कर्ण व पांडव, कर्ण व शल्य यांचे निरनिराळ्या वेळीं झालेले संवाद फारच उत्तेजक, मनोरंजक व परस्परांस उपहासक असे आहेत. ते मोरोपंतांनीं मूळापेक्षांही अधिक कुशलतेनें सजविलेले आहेत; म्हणून असले प्रसंग लिहितांना मोरोपंतांच्या आर्याभारताचा विशेष उपयोग केला आहे

४ कर्ण स्वतः अत्यंत हीन स्थितींतून अत्यंत उच्च स्थितीस स्वतःच्या कर्तबगारीनें चढला होता. तो रंकाचा राव झाला होता. व शेवटपर्यंत तो दैववाद तुच्छ मानून कर्मवादाचीच तरफदारी करीत असे, हें त्याचे दुर्योधनाशीं वेळोवेळीं झालेल्या संवादावरून व त्याच्या स्वतःच्या वर्तनावरून फार उत्तम रीतीनें दृग्गोचर होतें. कर्णाचें मित्र-

प्रेम, त्याची स्वकर्तव्यदक्षता, त्याचा स्वार्थत्याग, त्याची राजनिष्ठा, त्याचा आत्मविश्वास, त्याचा दीर्घोद्योग, हे सद्गुण नितांत अनुकरणीय आहेत. व ते यथाशक्ति या पुस्तकांत प्रसंगविशेषीं वर्णिलेले आहेत.

५ महाभारतामध्यें कोणाच्याही आयुर्मानाचा निश्चित असा उल्लेख सांपडत नाहीं. किंबहुना त्यांतील वर्ष व वर्षवाचक अपरपर्याय शब्द फारच भ्रामक अर्थी उपयोजिलेले आहेत. तथापि शक्य तो प्रयत्न करून या पुस्तकांत कर्णाच्या वयाची मर्यादा ठरविण्याचा प्रयत्न करून भारतीययुद्धकालीं कर्णाचें वय सत्तर वर्षांचें होतें असें यांत ठरविलें आहे. भारतांतील एका व्यक्तीचें वय निश्चितपणें ठरवितां आल्यास बाकींच्या व्यक्तींचीं वयें सहज ठरवितां येतील.

६ पुराणग्रंथ हे इतिहासग्रंथांहून भिन्न असणारच. परंतु आपला प्राचीन इतिहास पुराणांशिवाय इतरत्र सांपडणेंही शक्य नाहीं. म्हणून पुराणांतील कविकल्पना वजा करून इतिहास मिळविण्याचा जर प्रयत्न केला तर तो अगदींच वांया जात नाहीं, हें प्रस्तुत कर्णचरित्रावरून वाचकांच्या लक्ष्यांत येईलच. या चरित्रांत मुख्यतः मानवी शक्तीस शक्य अशाच गोष्टी किंवा हकीकती सुसंबद्ध रीतीनें दिलेल्या आहेत. किंबहुना कर्ण ही ऐतिहासिक व्यक्ति आहे, काल्पनिक व्यक्ति नव्हे, अशा नात्यानेंच हें चरित्र लिहिलेलें आहे.

७ असें हें चरित्र वाचकांस प्रिय होवो इतकीच त्या जगन्नियंत्या-कडेस मागणी आहे. ती प्रार्थनापूर्वक मागून ही अल्प प्रस्तावना संपवितों.

८ हें पुस्तक चार पांच वर्षांपूर्वींच लिहिलें असून आजपर्यंत पडून राहिलें होतें, तें रा. अनंतराव आ. मोरमकर यांनीं प्रसिद्ध केलें याबद्दल त्यांचे अभार प्रदर्शित केल्याशिवाय प्रस्तावनेची पूर्ति होणार नाहीं हें उघड आहे, म्हणून त्यांचे आभार मानितों.

नागपंचमी, शके १८४३. वि. स. वाकसकर.



# राधेयकर्णचरित्र.

## १

## बालपर्व.

उपोद्घात.

१. कर्ण ही व्यक्ति महाभारतांत प्रामुख्येंकरून वर्णिलेली आहे. नासिकेवांचून रूप, आरोग्याशिवाय संपत्ति, प्रेमव्यतिरिक्त स्वागत, जिज्ञासेवांचून ज्ञानदान, किंवा सूर्याचे अभावीं अर्घ्यप्रदान, हीं जशीं व्यर्थ होत, तसेंच कर्णहीन कौरवसेना, किंबहुना, अखिल महाभारतही व्यर्थ होय. ब्रह्मण्यता, दातृत्व, शौर्य, वीर्य, धैर्य, राजनिष्ठा, प्रतिज्ञापालन आणि आत्मविश्वास हे सद्गुण कर्णाच्या ठायीं मूर्तिमंत वसत होते. ही व्यक्ति एवढी प्रसिद्ध होती म्हणूनच कीं काय कोण जाणें, " कर्ण हा सूर्यपुत्र होय " असें महाभारतांत ठिकठिकाणीं म्हटलेलें आहे; कारण खरोखरींच हा सूर्यासारखा तेजस्वी, निर्भय, पराक्रमी, व प्रख्यात होता. महाभारताच्या अठरा पर्वांपैकीं— **सौप्तिक, ऐषिक, अनुशासन, अश्वमेध, मौसल** आणि **महाप्रास्थानिक**, अशा—सहा पर्वांत कर्णाचें वर्णन आलेलें नाहीं; व या पर्वांतील मजकुराचा विचार करतां तें येण्याचें कारणही नाहीं. बाकीचीं बारा, म्हणजे दोन-तृतीयांश पर्वें कर्णाचें वर्णन—बरें अगर वाईट कमी अधिक प्रमाणानें कां होईना पण—करीत आहेत. हें कर्णाचें चरित्र बारा पर्वांत

जें इतस्ततः फांकलेलें आहे, तें एकत्र करून वाचकांस सादर करण्याचें योजिलें आहे.

जन्म.

२. कर्णाची जन्मदात्री माता कुंती होय. ही कुंती पांडूची प्रथम भार्या असून पांडवांची मातुश्री होती. ही वसुदेवाची सख्खी भगिनी म्हणजे श्रीकृष्णाची आत होय. श्रीकृष्णाचा पितामह म्हणजे वसुदव आणि कुंती यांचा पिता जो आनकदुंदुभी ऊर्फ शूर, त्यानें आपला आतेभाऊ जो कुंतिभोज राजा यास, त्याला संतति नसल्यानें ह्या आपल्या कन्येस म्हणजे कुंतीस अर्पण केलें होतें. कुंतीचें जन्मदात्या पित्याच्या घरचें नांव पृथा असें असून ती कुंतिभोज राजाकडेस आल्यावर तिला कुंती हें नांव प्राप्त झालें. ही कुंती लहान असतांना एकदां हिच्या बापाच्या घरीं दूर्वास नांवाचा अत्यंत कोपी परंतु सदाचारसंपन्न ब्राह्मण अतिथि प्राप्त झाला. तो ब्राह्मण फार उंच असून त्याचें तेज फार प्रखर होतें. त्यानें दाढी व जटा राखिल्या असून हातांमध्यें दंडही धारण केलेला होता. त्याचा वर्ण पिंगट असून वाणी मधुर होती. तपश्चर्या व वेदाध्ययन हींच त्याचीं भूषणें होतीं. तो कुंतिभोज राजाला म्हणाला, "तुझ्या घरीं कांहीं दिवस राहण्याची माझी इच्छा आहे. मी मनसोक्त वागत जाईन, तत्रापि तूं अगर तुझे अनुयायी यांपैकीं कोणींही माझें मन दुखवितां कामा नये." कुंतीभोज राजानें ब्राह्मणाचें हें मागणें कबूल करून त्याच्या तैनातीमध्यें आपली सुशील, सदाचरणी, साध्वी, मनोनिग्रही, सद्गुणी व यशस्विनी पृथा-नामक कन्या दिली. पृथेनें दूर्वासाची व्यवस्था अनेक संकटें सोसून इतकी उत्कृष्ट ठेविली कीं, सरते शेवटीं तो

ब्राह्मण मनामध्यें संतुष्ट झाला आणि त्यानें आपण होऊनच कुंतीला पुत्रोत्पादनक्षम असा मंत्र दिला. पुढें कांहीं दिवसांनीं कुंती ऋतुस्नात झाल्यावर एके दिवशीं प्रातःकाळीं प्रासाद-तलावर उभी राहून पूर्वदिशेकडेस उदयोन्मुख सूर्यमंडळ अवलोकन करीत असतां त्या मंडलामध्यें तिला दिव्य मुद्रा व कवच धारण करून कुंडलांनीं विभूषित झालेली मूर्ती दिसली. याप्रमाणें सूर्य देवाला अवलोकन करितांच ती पंचबाणानें पीडित झाली, व पूर्वी ब्राह्मणानें दिलेल्या मंत्राचें सामर्थ्य पाहण्याविषयीं तिला उत्सुकताही उत्पन्न झाली. तत्काल तिनें मंत्रजप करून त्या तेजोगोलस्थ पुरुषाचें आव्हान केलें. तोंच पिंगट वर्ण, आजानुबाहु, शंखासारखा तीन रेषांनीं युक्त असलेला कंठ, बाहुभुषणें आणि मस्तकीं बांधिलेला मुकुट यांनीं युक्त असलेला तो सूर्य तिजजवळ प्राप्त झाला. आणि समागमाविषयीं तिची प्रार्थना करूं लागला. तिनें आपण कन्या असल्याचें सांगून सूर्याचे म्हणण्यास परोपरीनें अमान्यता दर्शविली. तेव्हां सूर्यानें नानाप्रकारें गोडीगुलाबीनें, धाकानें व प्रेमानें तिला समजून सांगितलें. तो म्हणाला, "मजपासून तुला महापराक्रमी व दिव्य कवचकुंडलें धारण केलेला असा पुत्र होईल, आणि कवच व कुंडलें हीं दोन्हीही त्याचीं अमृतमय असतील, आणि शिवाय तुलाही दोष लागणार नाहीं." सूर्याच्या या आग्रहपूर्वक विनंतीस कुंतीस आपली संमति दर्शविणें भाग पडलें. कुंतीचा गर्भ दिवसेंदिवस वाढत चालला व तिनेंही तो शेवटपर्यंत गुप्त ठेविला. कुंती गर्भिणी आहे हें एका दाईवांचून इतर कोणासही ठाऊक नव्हतें. योग्य प्रसंगीं तिला महाशस्त्रधर, शूर, भव्य, देवगर्भाप्रमाणें तेजस्वी, सुवर्णाच्या उज्ज्वल कुंडलांनीं

युक्त असा पुत्र झाला. त्याचे नेत्र सिंहासारखे असून स्कंध वृषभासारखे होते व तो हूबेहुब पित्याप्रमाणेंच होता. तो वज्र, छत्र, अंकुश, ध्वज, कूर्म, अंबुज इत्यादि राजलक्षणांनीं युक्त होता. तो गर्भ उपजल्याबरोबर कुंतीनें दाईच्या विचारें अत्यंत कष्टानें एका पेटींत ठेविला. त्या पेटीला सर्व बाजूंनीं वस्त्र लाविलेलें होतें. तिच्यामध्यें मऊपणा येण्यासाठीं सर्वत्र मेण पसरलेलें होतें. अशा प्रकारच्या त्या सुखावह पेटीमध्यें तो गर्भ ठेवून, तिचें झांकण घट्ट बसविलें, व ती पेटी अश्वनदींत मध्यरात्रीं सोडून दिली. जलप्रवाहामध्यें पेटी सोडतांना कुंतीला अत्यंत दुःख झालें. अश्वनदीमध्यें सोडिलेली ती पेटी चर्मणवतीमध्यें गेली, चर्मण्वतींतून यमुनेमध्यें प्रविष्ट झाली, व यमुनेंतून गंगेमध्यें वाहात वाहात आली. अशा रीतीनें ती पेटी गंगेच्या कांठच्या अंगदेशांतील चंपा नगरीला जाऊन पोंचली. ईश्वरी कृपेनें पेटींतील गर्भ अद्यापि जीवंत होता. ती पेटी अधिरथ नांवाच्या सूताच्या राधा नामक पत्नीला सांपडली. अधिरथही याच वेळीं आपली पत्नी जी राधा तिच्यासह गंगेवर स्नानाला आला होता. राधेला मुळींच अपत्य नव्हतें. म्हणून पेटींतील बालकाचें तिनें प्रेमपूर्वक लालन पालन केलें. कारण, हें बालक पाहिल्यापासून तिला अत्यंत आनंद झालेला होता व या बालकाच्या पायगुणानें तिलाही पुढें औरस पुत्र झाले. पेटींत सांपडलेलें बालक हाच आपला चरित्र-नायक कर्ण होय. कर्णाच्या मनांत आपली पोषणकर्ती माता जी राधा तिच्याबद्दल इतकें उत्कट प्रेम वसत होतें कीं, तो पुढें मोठा झाल्यावर आपण ज्या पांडवांशीं स्पर्धा करीत आहोंत, ते आपले सख्खे कनिष्ठ बंधु आहेत, असें जरी त्यास खात्रीपूर्वक कळलें, तरीही, स्वतःस

कौंतेय म्हणवून घेण्यापेक्षां राधेय म्हणवून घेण्यांतच अधिक भूषण वाटत असे. ही साद्यंत हकिकत पुढें येणारच आहे.

३. धार्तराष्ट्र आणि पांडव हे प्रथम कृपाचार्याजवळ धनुर्विद्येचा अभ्यास करीत होते. पुढें द्रोणाचार्यांच्या

**राजद्वारीं प्रवेश.** आगमनानंतर भीष्मांनीं या राजपुत्रांस द्रोणाचार्यांच्या स्वाधीन केलें. या कुमारांत अनेक देशांचे राजपुत्र होते व कर्णही होता. परंतु या राजकुमारविद्यालयासारख्या संस्थेंत कर्णासारख्या सूतजातीय विद्यार्थ्याचा प्रवेश कसा व कोणत्या कारणानें झाला, याचा उल्लेख महाभारतांत आढळत नाहीं. तथापि एवढा तर्क करण्यास हरकत नाहीं कीं, कर्णाचा पिता जो अधिरथ तो धृतराष्ट्राचा सखा व सारथी असून श्रीमान् होता, व त्याचें राजदरबारीं वळणही होतें. कर्णासारख्या तेजस्वी व चपल मुलास एवढीच संधि राजदरबारीं आपला प्रवेश करून घेण्यास पुरेशी होती. लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, तत्कालीन राजपुत्रांनीं आणि त्यांच्या मालकांनींही कर्णाचा प्रवेश या मंडळींत होण्यास प्रतिबंध केला नाहीं. अशा रीतीनें कर्णाचा प्रवेश या राजपुत्रमंडळांत झाला असेल, असें वाटतें.

४. द्रोणाचार्यांनीं आपले सर्व विद्यार्थी धनुर्विद्येत निष्णात केल्यावर भीष्म, धृतराष्ट्र इत्यादि मंडळींच्या

**विद्यार्थ्यांची परीक्षा.** अनुमतानें या विद्यार्थ्यांची परीक्षा घेण्याचें ठरविलें. परीक्षेचें ठिकाण पांडवांचा चुलता जो विदुर त्याच्या मतानें द्रोणाचार्यांनीं नक्की केलें. हें स्थल मोठें अफाट व वृक्षरहित असें मैदान असून

उत्तरेकडेस किंचित् उतरतें असें होतें. कारण धनुर्विद्येच्या परीक्षेस अशाच स्थळाची आवश्यकता असते. या भूमीचें द्रोणाचार्यांनीं उत्तम मुहूर्तावर पूजन केलें, व परीक्षेची वेळ सर्व लोकांस जाहीर करून येथें येण्यास निमंत्रण दिलें. या रंगभूमीवर कारागिरांनीं स्त्रियांना बसण्यासाठीं एक पृथक् ठिकाण तयार केलें होतें. त्या ठिकाणीं उंच उंच असे मोठे मंचक व मोठया शिबिकाही ठेविल्या होत्या. हें दिव्य प्रेक्षागार सुवर्णमय असून वैडूर्य मण्यांनीं सुशोभित केलेलें होतें. त्याच्या भोंवतीं मोत्यांचें जाळें लाविलेलें होतें. ठरलेल्या दिवशीं सर्व नागरिक येथें खेळ पाहण्यास जमा झाले. भीष्म-धृतराष्ट्र-कृपाचार्य इत्यादि मंडळीही तेथें आली होती. स्त्रियांमध्यें गांधारी, कुंती ह्याही आपापल्या मंचकारूढ झाल्या होत्या. याप्रमाणें प्रेक्षकमंडळ जमल्यावर योग्य वेळीं परीक्षेस सुरुवात झाली. सर्व कुमारांनीं प्रथम तेथें कवाईत करून दाखविली. त्यावेळीं त्यांची चलाखी, चातुर्य ! शोभा, निर्भयपणा, दृढमुष्टित्व इत्यादि सद्गुण पाहून प्रेक्षक आश्चर्य-चकित झाले. प्रत्येक कुमारानें पृथक्पणें आपली विद्या दाख-विली. त्यावेळीं अर्जुनाची कृतास्त्रता व शस्त्रनैपुण्य हीं पाहून भीष्मासह सर्व जाणते प्रेक्षक थक्क होऊन गेले; प्रत्येकाच्या तोंडांतून धन्योद्गार निघूं लागले. इतक्यांत मोठेपणा व बल यांचा सूचक असा विजांच्या गडगडाटासारखा दंड ठोकण्याचा आवाज रंगभूमीच्या द्वारप्रदेशाकडून ऐकूं येऊं लागला. तेव्हां सर्वांना असें वाटलें कीं, आतां पर्वताचा चुराडा होत आहे ? किंवा भूमी विदीर्ण होत आहे?—अगर धारापूरित मेघांनीं आकाश व्याप्त होत आहे ?—होत आहे तरी काय ?—अशा विचारांनीं

सर्वांचे नेत्र द्वारप्रवेशाकडेस सहजींच वळले. तोंच त्यांना आंगचें कवच धारण करणारा, कुंडलांच्या योगानें मुखावर शोभा आलेला आणि धनुष्य व खड्ग धारण केलेला पादचारी पर्वतच कीं काय, असा तेजस्वी कर्ण विस्तीर्ण रंगभूमींत प्रविष्ट झालेला दिसला. तो सिंहासारखा बलाढ्य, वृषभाप्रमाणें वीर्यवान्, गजेंद्रतुल्य पराक्रमी, सूर्यवत् देदीप्यमान, चंद्राप्रमाणें कांतिमान्, अग्नीसारखा तेजस्वी, सुवर्णाच्या ताडाप्रमाणें उंच व असंख्य गुणांनीं युक्त असा होता. कर्णानें रंगभूमीवर येतांच चोहोंकडे एकवार पाहून द्रोणाचार्यांस व कृपाचार्यांस वंदन केलें व निर्भयतेनें अर्जुनास म्हटलें, “ हे अर्जुना ! तुला निष्कारण गर्व होऊं देऊं नकोस. तुझ्यापेक्षां अधिक पराक्रम तुझ्यासुद्धां या लोकांसमक्ष मी आतांच करून दाखवितों. ” हें बोलणें ऐकतांच दुर्योधन आनंदित झाला व अर्जुन क्रुद्ध झाला.

**कर्णाचा पराक्रम व त्यास अंगराज्य प्राप्ति.**

५. कर्णानें रंगभूमीवर येऊन द्रोणाचार्यांच्या अनुज्ञेनें अर्जुनानें जें केलें होतें, तें सर्व करून दाखविलें. किंबहुना अर्जुनापेक्षांही कांकणभर अधिक केलें. सर्व सभासद फारच आश्चर्यचकित झाले. दुर्योधनास तर जणूं प्रेमाचा पान्हाच फुटला. तो म्हणाला, “ हे कर्णा ! हें माझें सर्व राज्य तुझें आहे असें समजून आजपासून अकृत्रिम स्नेहाच्या नात्यानें तूं वागत जा, व आम्हीही तसेच वागूं.” कर्ण म्हणाला, “ तें सर्व ठीक आहे. परंतु माझा एकच हेतु आहे. तो हा कीं, अर्जुनाशीं एकदां माझें द्वंद्वयुद्ध व्हावें. अर्जुनास तें सहन न होऊन तो म्हणाला, “ हे कर्णा ! हा तुझा सभ्यपणा तुला

जरी योग्य वाटला, तरी तो अत्यंत नीच आहे हें तूं खात्रीनें समज. अझून सावध हो, नाहींतर एका क्षणांत प्राणांस मुकशील." झालें. या भाषणावरून दोघेही शस्त्रास्त्रें घेऊन सरसावले. पांडव एका बाजूस व शंभर कौरवांसह कर्ण दुसऱ्या बाजूस, असा सामना उभा राहिला. हा रंग पाहण्यास स्त्रियाही पडद्यांत बसल्या होत्या. आपल्या पुत्रांचा हा कलह पाहून कुंतीस फारच वाईट वाटलें. यावरून असें दिसतें कीं, कुंतीनें जरी कर्णाचा तो उपजतांच त्याग केला होता, तरी तो कुठें आहे ? काय स्थितींत आहे ? व कसा आहे ? याचा ती बारकाईनें बरोबर तपास ठेवीत असे, व म्हणूनच ती यावेळीं कर्णास ओळखती झाली. असो. कर्ण हा पराक्रमानें अर्जुनापेक्षां अधिक आहे, असें कृपाचार्यांनीं जाणून हें द्वंद्वयुद्ध निराळ्याच युक्तीनें थांबविलें. ते म्हणाले, " कर्णा ! द्वंद्वयुद्धकर्ते वीर कुलशीलादिकांनीं समान असावयास पाहिजेत, असा या युद्धाचा नियम आहे. अर्जुन ज्या कुरुकुळांत उत्पन्न झालेला आहे, तें तर कीर्तीनें, पराक्रमानें व शुद्धपणानें जगद्विख्यात आहे. आतां तूं स्वतः कोणत्या कुळाचें भूषण आहेस हें एकदां आम्हांस कळूं दे. म्हणजे पुढील युद्धास तुम्हांस परवानगी देण्यास बरें पडेल. भलत्याशींच राजपुत्रानें द्वंद्व करूं नये, म्हणून तुला हें विचारितों." हे शब्द ऐकतांच कर्णाचें तोंड खर्रकन उतरलें; पर्जन्यानें भिजून जाऊन खालीं गळलेल्या कमलाप्रमाणें तें दिसूं लागलें, व तो खालीं पाहूं लागला. हें पाहून दुर्योधनास फार वाईट वाटलें. तो म्हणाला, "आचार्य! शास्त्रार्थ पाहूं गेलें तर असें दिसतें कीं, राजांना योग्यता येण्यास सत्कुलीनत्व, शूरत्व, व सेनानायकत्व, अशीं तीन कारणें

आहेत. राजा नसलेल्या पुरुषांशीं जर हा अर्जुन, युद्ध करीत नसेल तर या कर्णाला मी अंगदेशाच्या गादीवर आतांच बसवितों.'' असें म्हणून त्यानें खरोखरीच महारथी कर्णाला तत्काळ सुवर्णासनावर बसवून मंत्रवेत्त्यांकडून सुवर्णकुंभांनीं अभिषेक करविला. अभिषेक होतांच कर्णावर छत्रचामरादि वैभवें ढळूं लागलीं. तेव्हां कर्ण दुर्योधनास म्हणाला, " राजा ! या राज्याचा मोबदला मीं तुला काय द्यावें ? " हें ऐकतांच दुर्योधनानें मागितलें कीं, "यावज्जीव तुझें अत्यंत सख्य असावें." कर्णानें 'तथास्तु' म्हटलें व कर्णदुर्योधन एकमेकांस प्रेमानें भेटले.

**भीमकृत कर्णोपहास.**

६. वर सांगितलेला प्रकार होत आहे तोंच घाईघाईनें अधिरथसूत कर्णाचा शोध करीत रंगभूमीवर प्राप्त झाला. त्याला पाहतांक्षणींच अभिसिंचित जलानें मस्तक आर्द्र झालेल्या कर्णाचे मनांत पूज्य बुद्धि उत्पन्न होऊन त्यानें त्यास मस्तकानें वंदन केलें. अधिरथानेंही पुत्राच्या वैभवानें व वात्सल्यानें प्रेमविव्हळ होऊन त्याला एकदम कवटाळिलें. अधिरथ हा सूत असून कर्ण हा त्याचा मुलगा आहे हें तेथें प्रत्यक्ष पाहतांच भीमाच्या जिभलीस वाचा फुटली, व तो हंसत हंसत कर्णाला म्हणाला, "युद्धांत क्षत्रियांनाच मरण योग्य आहे. हे सूतपुत्रा कर्णा ! प्रतोदधारण हें तुझें कर्म असल्यानें अर्जुनाचे हातून संग्रामांत मरण्यास तूं योग्य नाहींस. चापग्रहण तुला श्लाघ्य नाहीं, म्हणून चाप फेंकून देऊन हातांत चाबूक धर. हे नराधमा ! यज्ञामध्यें अग्नि जवळील यज्ञांतील पुरोडाशाला योग्य नसलेल्या श्वानाप्रमाणें राज्योपभोग तुला मुळींच योग्य नाहींत. '' हें ऐकून कर्णाचा अधरोष्ट फुरफुरूं

लागला व लांब सुस्कारा टाकून तो मुकाट्यानें आकाशस्थ सूर्याकडे पाहूं लागला. तेव्हां बलाढ्य दुर्योधन धृतराष्ट्ररूप कमलवनांतून मत्तहत्तीप्रमाणें पुढें सरसावला व भीमाला म्हणाला, " हे भीमा ! अशा रीतीनें एका वीरास मर्मभेदक भाषण बोलणें तुझ्या बलाच्या गर्वाचें द्योतक आहे. महात्मे अथवा वीर आणि नद्या ह्यांचें उत्पत्ति-स्थान अतर्क्य असल्यानें सुज्ञलोक तिकडेस लक्ष देत नाहींत. वीरांचें अनुकरणीय चरित्र व नद्यांचें पवित्रत्व एवढेंच फक्त बहुजनसमाज ध्यानांत घेत असतो. पाण्यापासून अग्नि उत्पन्न झाला असून त्यानें आपल्या तेजानें हें चराचर व्यापिलें आहे. भगवान् स्कंद ( षण्मुख ) हा अग्नि, कृत्तिका, रुद्र अथवा गंगा यांपैकीं कोणाचा पुत्र हेंच नक्की नाहीं. म्हणजे यांचें सर्वच गुह्य आहे. तथापि त्याच्या पराक्रमांत तेवढ्यानें काय उणेंपण आलें आहे ? क्षत्रियापासून उत्पन्न झालेले विश्वामित्रप्रभृति विप्र म्हणून प्रसिद्ध असून त्यांना अक्षय्य ब्रह्मत्व प्राप्त झालें आहे. महा-शस्त्रधर द्रोणाचार्यांचें द्रोणकलशापासून जनन झालें असून, शर-स्तंभापासून कृपाचार्य झाले आहेत; मृगीपासून ऋष्यशृंगि नांवाचा महात्मा जन्मलेला आहे. परंतु यांत स्वयोनिदोषानें कोण बरें मळला आहे ? अरे ! दधीच ऋषींच्या अस्थींपासून वज्र उत्पन्न झालें आहे तरी त्या वज्रास काय कमीपणा आला आहे. हें तूं सांगूं शकशील काय ? पण इतरांची गोष्ट कशाला पाहिजे ? तुह्मां पांडवांची उत्पत्तिही मला कळली आहे. तुह्मी कां नाकानें कांदे सोलितां हें कळत नाहीं. कर्णासारखा तेजस्वी, सर्वलक्षणसंपन्न व सहजकवचकुंडलधर पुत्र जर राधेसारख्या सामान्य स्त्रीस होऊं लागेल तर मृगीसुद्धां व्याघ्रास जन्म देईल. प्राकृत योषा,

याची जननी असणें शक्यच नाहीं. स्वाती नक्षत्राचें पाणी पुष्कळ शिंपा पोटांत घेतात, पण मोत्यांस मात्र त्या सर्वच प्रसवूं शकत नाहींत, हें तुला ठाऊक नाहीं काय ? हा कर्ण नुसत्या अंगदेशाचाच नव्हे, परंतु सर्व पृथ्वीचा राजा होण्यासही योग्य आहे." हें दुर्योधनाचें सणसणीत भाषण ऐकिल्यावर पांडव मनांत वरमले, व सभा बरखास्त झाली. कर्णाच्या तोंडचा खालील श्लोक प्रसिद्ध आहे; तो वेणीसंहार नाटकांत अशाच एका प्रसंगीं कवीनें घातला आहे.

॥ श्लोक ॥

सूतो वा सूतपुत्रो वा यो वा को वा भवाम्यहम् ।
दैवायत्तम् कुले जन्म मदायत्तं तु पौरुषम् ॥ १ ॥



## २

# स्वयंवरपर्व.

**ब्रह्मास्त्रप्राप्ति.**

द्रोणाचार्यांच्या छात्रवर्गांत अर्जुन हा द्रोणाचार्यांस सर्वांहून अधिक प्रिय वाटत होता. म्हणून द्रोणानें त्यास ब्रह्मास्त्र शिकविलें. ही गोष्ट कर्णास समजल्यावर त्यानें आचार्यांची अत्यन्त नम्रभावानें प्रार्थना करून ब्रह्मास्त्राची याचना केली आणि सांगितलें कीं, "या अस्त्राच्या प्राप्तीनें अर्जुन मजहून श्रेष्ठ झाला आहे, तरी कृपा करून तें मला द्या ! म्हणजे मी अर्जुनापेक्षां श्रेष्ठ जरी नाहीं तरी त्याच्या बरोबरीचा होईन." कर्ण अर्जुनाच्या बरोबरीचा व्हावा ही गोष्ट द्रोणास मुळींच इष्ट नव्हती; कोणीही अर्जुनाची बरोबरी करूं नये, अशीच उलट त्यांची इच्छा होती, मग कर्णाची गोष्ट पाहिजे कशाला ? म्हणून ते कर्णाला म्हणाले, "बा कर्णा ! हें अस्त्र ब्राह्मण किंवा क्षत्रिय यांनाच प्राप्त होत असतें, तिसऱ्याला तें प्राप्त होत नाहीं. तूं ब्राह्मणही नाहींस व क्षत्रियसुद्धां नाहींस ! याकरितां तुला या जन्मीं हें प्राप्त होणें शक्य नाहीं." हें द्रोणाचें भाषण ऐकून कर्णास फारच वाईट वाटलें, परंतु अस्त्र प्राप्त करून घेण्याची उत्कंठा मात्र कमी झाली नाहीं. द्रोणाचार्यांपासून आपणांस ब्रह्मास्त्र प्राप्त होत नाहीं, अशी कर्णाची खातरी झाल्यावर तो त्यांस वन्दन करून त्यांची परवानगी घेऊन जो निघाला, तो महेन्द्र पर्वतावर परशुराम राहत होते तेथें गेला; **गुरु व पिता यांचे अधिकार समान आहेत.** द्रोण हे ब्राह्मण असून आपले गुरु आहेत; आणि ब्रह्मास्त्र ब्राह्मण

व क्षत्रिय यांशिवाय इतरांस दुष्प्राप्य आहे. इतक्या गोष्टी कर्णानें लक्षांत आणून, आपण ब्राह्मण आहोंत असें लटिकेंच परशुरामास सांगून त्यांचें शिष्यत्व पत्करून तो तेथें राहिला. मृगाची भयचकितता, शुनकाची जागरूकता आणि कावळ्याची इंगितज्ञता, हे सद्गुण ग्रहण करून घेऊन कर्णानें भार्गवरामाची इतकी उत्कृष्ट सेवा केली, व शरसन्धानाचा इतका अत्यन्त निपुण अभ्यास केला, कीं परशुरामानें प्रसन्न होऊन शेवटीं कर्णास ब्रह्मास्त्र शिकविलें. परशुरामाश्रमांतील साद्यन्त हकीकत कर्णानें स्वतःच सांगितली आहे. ती पुढें शल्यकर्ण-संवादांत ओघानें येईल.

**भानुमतीस्वयंवर.**

२. द्रौपदीस्वयंवराचें जसें विस्तृत वर्णन आदिपर्वांत आहे, तसें तें दुर्योधनाच्या पत्नीचें म्हणजे भानुमतीच्या स्वयंवराचें सबंध महाभारतांत कोठेंच नाहीं. किंबहुना भानुमती हें नांवही महाभारतांत नाहीं. कवींनीं कल्पिलेलें आहे. फक्त या स्वयंवराचा भीष्म व शान्ति अशा दोन पर्वांत तुरळक उल्लेख झालेला आहे. त्यांतही गांवाच्या नांवांत फरक आहे. भीष्मपर्वांत, भीष्म हें स्वयंवर काशिपुरांत झाल्याचें सांगतात, व नारद, शान्तिपर्वांत, तें कलिंग देशातील राजपुरास झाल्याचें सांगतात. मग कलिंग देशची राजधानी काशिपुर ऊर्फ राजपुर असल्यास न कळे ! भीष्मपर्वांतील उल्लेख पुढें यथास्थळीं येईलच. तूर्त शान्तिपर्वांतील हकीकत काय आहे ती आपण पाहूं. परशुरामापासून अस्त्रप्राप्ति होऊन कर्ण दुर्योधनास येऊन भेटल्यानंतर थोडक्याच दिवसांनीं हें भानुमतीचें स्वयंवर झालें आहे असें तेथें म्हटलें आहे; अर्थात् द्रौपदीस्वयंवराचे पूर्वीं हें स्वयंवर झालें असावें असें वाटतें. या स्वयंव-

रास देखील रुक्मी, कपोतरोमा, नील, जरासन्ध, भोज, शिशु-पाल, क्रथ, अशोक, भीष्मक, शृगाल, इत्याद्यनेक राजे हजर होते. भानुमतीच्या पित्याचें नांव चित्राङ्गद असून तो कलिङ्ग देशचा राजा होता व त्यानेंच हें राजमंडल बोलाविलें होतें. साधारणतः स्वयंवरांत अशी चाल असे कीं, स्वयंवरार्ह वधूनें जमलेल्या राजसमुदायांत एका ' पुंवत्प्रगल्भा ' व ' नृपाणां श्रुत-वृत्तवंशा ' अशा सखीसह येऊन तिजकडूनच त्या राजांची पृथक् पृथक् कीर्ति श्रवण करावी. जो अनुरूप आहे असें तिला वाटेल त्याच्या गळ्यांत माळ घालावी. प्रत्येक राजापुढें जाऊन त्या राजाचें सखीकृत वर्णन ऐकून तो नापसंत झाल्यास पुढें सरकावें. असा क्रम वराच्या पसंतीपर्यंत चाले, या क्रमानुसार भानुमती इतर राजांप्रमाणें दुर्योधनाचेंही उल्लङ्घन करूं लागली. परंतु मानी दुर्योधनास तें सहन झालें नाहीं. त्यानें एकदम उठून भानुमतीस उचलून आपल्या रथांत घातलें. वास्तविक हा तेथें जमलेल्या सर्व राजांचा त्यानें अपमान केला. हें पाहून, सर्व राजमण्डल खवळून एकदम युद्धार्थ सिद्ध झालें. परंतु काय! दुर्योधनाच्या बाजूनें कर्ण पुढें सरसावला, व दुर्योधनानें भानुमतीचें जसें अकल्पित व सहसा हरण केलें, तसेंच कर्णानेंही त्या सर्व नृपा-ळांच्या कीर्तीचेंही हरण केलें. कर्णाच्या शरसन्धानापुढें एकही वीर टिकला नाहीं. पूर्वी काशिराजाच्या तीन कन्या हरण कर-तांना भीष्मांवर ज्या प्रकारचा प्रसंग होता, त्याच प्रकारचा हुबे-हुब प्रसंग कर्णावर या वेळीं होता. भीष्मांनीं स्वतःच्या भ्रात्यां-करितां कन्यांचें हरण, करून सर्व राजांशीं युद्ध केलें व त्यांस जिंकिलें. येथें कर्णानें मित्रासाठीं घनघोर रणसंग्राम केला व त्यांत

विजयश्री प्राप्त करून घेतली. तिकडेस भीष्मांशीं सरतेशेवटीं शाल्व जसा लढाईस आला, तसाच इकडे कर्णाशीं जरासन्ध द्वन्द्वास आला. परन्तु कर्णानें त्याचीही रग जिरविली. बाहुयुद्धांत त्याच्या शरीराचा जरेनें सांधिलेला सान्धाही निखळून टाकिला. मग मात्र तो घाबरला व त्यानें कर्णाशीं सख्य करून त्याला चम्पा नगरी देणगी देऊन आजन्म सख्य मागितलें. कर्णाच्या या पराक्रमाची जाणीव भीष्मांसही होती, असें त्यांनीं, सरतेशेवटीं, कर्णाच्या या पराक्रमाबद्दल मोठ्या प्रेमानें जो गौरवपूर्वक उल्लेख कर्णाजवळ केला आहे त्यावरून स्पष्ट होतें.

३. ब्रह्मास्त्र प्राप्त करून घेतल्यावर कर्णानें दुर्योधनास भेटून आपण कृतकृत्य झाल्याचें त्यास सांगितलें.

**द्रौपदीस्वयंवर.**

हें ऐकून दुर्योधनासही आनन्द झाला. मध्यन्तरीं भानुमतीचें स्वयंवर होऊन कित्येक दिवस गेल्यावर द्रुपदाकडून स्वयंवराचें आमंत्रण आलें. यावेळीं पाण्डव लाक्षागृहांत दग्ध झाल्याचें प्रसिद्ध झालें होतें. द्रुपदराजानें स्वयंवराविषयीं प्रसिद्धी केली होती. ती ऐकून सर्व राजे व ऋषी स्वयंवराचा समारम्भ पाहण्यासाठीं दक्षिण पांचाल देशांत एकत्र जुळले. कर्णासहवर्तमान सर्व कौरवही तेथें गेले होते. स्वयंवर पाहण्यासाठीं देशोदेशींचे राजे मंचकावर अगदीं खेटून बसले होते. पौरजनांची आनन्दाची गर्जना समुद्राच्या गंभीर गर्जनेप्रमाणें होत असतां तारापुंजात्मक जें शिशुमार-संज्ञक विष्णुस्वरूप त्याच्या शिरोभागीं म्हणजे नगरीच्या समीप ईशान्येस सपाट आणि शुद्ध अशा जमिनीवरही कांहीं राजे येऊन बसले. लोकसमुदायासाठीं तयार केलेलें पटांगण सर्व बाजूनीं घरांच्या पोगें वेष्टित असल्यामुळें चांगलें शोभत होतें. तें पटांगण

प्राकार व खंदक यांनीं युक्त असून कमानी व तोरणें यांनीं भूषविलें होतें. त्याचप्रमाणें रंगीबेरंगी चांदव्यांनीं तें सुशोभित केलेलें होतें. वाजंत्र्यांचे शेंकडो ताफे त्यांत होतें. उत्कृष्ट प्रकारच्या अगरूनें तें सुवासित केलें होतें. चंदनोदकांनीं तेथें सडे घातले होते आणि पुष्पमालांनीं त्या स्थानास शोभा आणिली होती. तें पटांगण बरेंच उंच असल्यानें, कैलासपर्वताच्या शिखराप्रमाणें गगनचुम्बित असलेल्या शुभ्र राजवाडयांनीं तें व्याप्त झालें होतें. ते राजवाडेही सुवर्णाच्या जाळ्यांनीं व्याप्त झाले होते. रत्नखचित फरसबंद्यांनीं ते विभूषित होते व त्यांतील जिने चढण्याउतरण्यास सुलभ असे होते. मोठमोठे रुजामे व चादरी आंत पसरलेल्या होत्या. त्या राजवाडयांना द्वारेंही अनेक होतीं. शय्या व बैठकी यांच्या योगानें त्यांना शोभा आणिली होती. व पुष्कळ प्रकारचे धातु त्यांच्या निरनिराळ्या भागांतून बसविलेले असल्यामुळें, ते हिमालयपर्वताप्रमाणें चकाकत होते. तेथें जमलेले सर्व राजे एकमेकांशीं स्पर्धा करणारे महाबलाढ्य व पराक्रमी असून त्यांनीं आपल्या शरीरांना कृष्णागरूंची उटी लाविली होती. याप्रमाणें जमलेल्या त्या राजसभेंत मेघाप्रमाणें अथवा दुंदुभीप्रमाणें गंभीर अशा स्वरानें धृष्टद्युम्न म्हणाला, "येथें हें धनुष्य व बाण आहेत; अन्तरिक्षामध्यें परिभ्रमण करीत असलेल्या यन्त्राच्या या छिद्रांतून तुम्ही तीक्ष्ण अशा या पांच गगनसंचारी बाणांनीं निशाण मारा! कारण कुलीन, रूपवान् व बलवान् असा जो पुरुष हें महत्कर्म करील, त्याची भार्या, ही माझी भगिनी कृष्णा आज होईल.' धृष्ट द्युम्नानें याप्रमाणें समस्त राजवृन्दास सांगून मग तो आपल्या भगिनीस म्हणाला, "हे कृष्णे! हे सर्व राजपुत्र तुझ्याकरितां येथें जमले आहेत. हे पराक्रमी क्षत्रिय तुझ्या-

साठीं या अनुपम लक्ष्याचा भेद करण्यास प्रवृत्त होतील. तरी जो या लक्ष्याचा भेद करील त्याला तूं आज माळ घाल!" नन्तर तेथें बसलेल्या नृपगणांना क्रमाक्रमानें आपला पराक्रम प्रगट केला. कलिङ्ग, वङ्ग, पाण्डव, पौण्ड्र, विदेह व यवन या देशांचे अधिपति शौर्य धैर्य, वीर्य व पराक्रम यांनीं युक्त होते; तथापि अतिशय कठीण असलेल्या त्या धनुष्याला प्रत्यंचा चढविण्याचें मनांत आणण्यासही ते समर्थ नव्हते. यामुळें ती चढविण्याचा प्रयत्न करीत असतांच त्या धनुष्याच्या टोंकाचा हिसका बसून ते भूमी-वर धडाधड पडले. याप्रमाणें ते क्षत्रिय परावृत्त झाले असतां दिसण्यांत यमासारखा असून धैर्य, बल व वीर्य यांनीं युक्त असलेला चेदिदेशाधिपति दमघोषपुत्र शिशुपाल उठला. परन्तु धनुष्यास हात लावितांच त्याचीही खालीं गुडघे टेंकण्याचीच पाळी आली. तदनन्तर महाबलाढ्य व वीर्यवान् जरासन्ध राजा पुढें सरसावला. परन्तु धनुष्य उचलून तो नमवूं लागला असतां, त्याला अत्यन्त पीडा झाली व तोहि एकदम गुडघ्यावरच आपटला. पुढें मद्रदेशाधिपति शल्य राजाचीहि तीच अवस्था झाली. याप्रमाणें हताश झालेल्या त्या राजमण्डळाला अवलोकन करून व झालेली हकीकत सर्व राजमण्डळाला अत्यन्त लाजिरवाणी होय असें जाणून ज्याच्या पुढें 'परचापश्रुतिकुशलतेचा' लेशही टिकत नव्हता, त्या कर्णानें तत्काल उठून धनुष्यास प्रत्यंचा चढविली. व त्याला तो बाणही लावूं लागला. हें पाहतांच तेथें गुप्त रूपानें असलेले पाण्डव घाबरले. कारण त्यांची खातरी होती कीं, कर्ण लक्ष्यभेद करूं शकेल. परन्तु इतक्यांत कर्णाचें सूतजातित्व तेथें कर्णास आडवें आलें. द्रौपदी एकदम म्हणाली, जरी यानें लक्ष्यभेद केला तरीही मी सूतजातीय वराला वरणार नाहीं. हें ऐकून कर्णानें क्रोधपूर्वक हास्यानें सूर्याकडेस अवलोकन करून तें

धनुष्य तेथें टाकून दिलें व तो आपल्या जागेवर जाऊन बसला. पुढें या चल लक्ष्याचा भेद अर्जुनानें केला, परन्तु त्यावेळीं त्यास कोणीही ओळखिलें नाहीं, म्हणून तेथें त्यास ब्राह्मण समजून इतर राजांनीं त्याशीं संग्राम केला. त्यांत कर्णार्जुनांच्या युद्ध- प्रसङ्गीं अर्जुनाचा पराक्रम पाहून कर्ण अर्जुनास म्हणाला, " हे विप्रा! युद्धामध्यें तुझें बळ पाहून व यत्किंचित्‌ही न भीतां शस्त्रास्त्रांमध्यें तूं दाखविलेलें प्रवीण्य अवलोकन करून मी फार सन्तुष्ट झालों आहें. मला वाटतें, स्वस्वरूप गुप्त ठेविण्या साठीं विप्ररूपानें तूं प्रत्यक्ष धनुर्वेदी, परशुराम, अच्युत अथवा इन्द्रच प्राप्त झाला आहेस ?" यावर अर्जुनानें उत्तर केलें, " तूं म्हणतोस त्यांपैकीं मी कोणीही नाहीं. ब्राह्म व पौरंदर या अस्त्रांमध्यें निपुण असलेला एक ब्राह्मण आहें." हें ऐकून ब्राह्मणाचा वध करणें पाप होय व ब्रह्मतेज साधारणतः असह्यही असतें, हें जाणून कर्ण या वेळीं रणांतून परत फिरला.

५. पुढें सभापर्वांत कौरवपाण्डवांचें द्यूत झाल्याचें साग्र वर्णन आहे. त्यांत पाण्डव सर्वस्व हारले.

**कर्णकृत द्रौपद्युपहास.** शेवटीं त्यांनीं आपली पत्नी द्रौपदी हिला पणास लाविलें, व तोही पण ते हारले. एकाम्बरा द्रौपदीला दुःशासनानें सभेंत ओढून आणिलें. तिनें, आपण 'जिता कीं, अजिता ?' असा प्रश्न सर्व सभासदांस वारंवार विचारिला. निश्चयात्मक असें कोणीच कांहीं बोलेना. शेवटीं कौरवांपैकीं एक विकर्ण पुढें सरसावून सर्व मुखस्तंभ सभ्यांची निन्दा करून म्हणाला, " हे भूपाल हो! तुम्ही द्रौपदीच्या प्रश्नाचें उत्तर द्या, अगर नका देऊं. मला जें या प्रसङ्गीं योग्य वाटत आहे तें मी सांगतों; **मृगया, मद्यपान, द्यूत आणि अति- रिक्त स्त्रीसङ्ग हीं चार राजव्यसनें म्हणून प्रसिद्ध आहेत. या**

व्यसनांमध्यें मनुष्य आसक्त झाला असतां तो अधर्मानें वागतो, आणि म्हणूनच अशा व्यसनाधीन पुरुषाचें कृत्य कोणीही खरें समजत नाहीं. युधिष्ठिराची येथें अशीच स्थिति झालेली आहे. स्वतःला हारवून घेतल्यानन्तर यानें शकुनीच्या सांगण्यावरून द्रौपदीला पणाला लाविलें. या सर्व गोष्टींचा विचार करितां द्रौपदी अजिता आहे असें मी समजतों !" हें विकर्णाचें भाषण ऐकून कर्ण अतिशय रागावला आणि म्हणाला, "विकर्णा! अग्नि अरणीपासून उत्पन्न होऊन तिच्याच नाशास प्रवृत्त होत असतो, त्याप्रमाणें तूंही या धृतराष्ट्रापासून उत्पन्न होऊन याच्याच नाशाला कारणीभूत होत आहेस ! अरे ! ही धर्मानें जिंकिली गेली असल्यामुळें भीष्मद्रोण देखील तिला कांहीं एक उत्तर देत नाहींत. अशा स्थितींत तूं तिला अजिता असें म्हणतोस, याला काय म्हणावें ? विकर्णा ! अत्यंत मूढ असा तूं जिता द्रौपदीला अजिता म्हणत आहेस त्या अर्थी तुला धर्माचें यथार्थ ज्ञान नाहीं. युधिष्ठिरानें जर सर्वस्व पणास लाविलें आहे, तर, द्रौपदी जिंकिली गेली नाहीं, असें तूं कसें मानीत आहेस ? द्रौपदीचा अन्तर्भाव युधिष्ठिराच्या सर्वस्वामध्यें होतो. विदुरासारखीच तुझी बुद्धिही भ्रष्ट झाली आहे काय ? अरे वाचाळा ! इतके सभासद येथें बसले आहेत, त्या सर्वांत तूंच एकटा शहाणा आहेस काय ? किंवा हे सर्व जण काय मुके आहेत ? वक्तृत्व, धर्मज्ञत्व हे गुण काय भीष्मापेक्षां तुझ्या ठिकाणीं अधिक आहेत ? द्रौपदी वारंवार प्रश्न विचारीत असतांही ज्या अर्थी हे सभ्य, पाण्डव व वृद्ध आप्त कांहींच बोलत नाहींत, त्या अर्थी ही जिता असेंच स्पष्ट होत आहे. सतीला सभेंत आणूं नये, असें तूं कदाचित् म्हणशील. परन्तु यावर मी असें विचारितों कीं, द्रौपदी सती कसली ? सतीस एकच पति असतो,

परन्तु हिला तर पांच पति आहेत. म्हणून तिचा सभाप्रवेश, हिचें एकाम्बरत्व किंबहुना नग्नत्वही मुळींच विचित्र नाहीं. पाण्डवांस स्त्री व धन यांसुद्धां शकुनीनें जिंकिलें आहे. म्हणून दुःशासना! या मूर्ख पोराच्या बडबडीकडेस लक्ष न देतां, पाण्डवांचीं वस्त्रें काढून घे, व या दासी द्रौपदीचेंही वस्त्र हिसकून घे." या नन्तर कर्ण द्रौपदीस म्हणतो, "हे द्रौपदी! **दास, स्त्री आणि पुत्र हे वस्तुतः निर्धन होत. म्हणजे यांच्या शरीरावर व द्रव्यावर अनुक्रमें धनी, पति व पिता यांची मालकी असते. तेव्हां दास झाल्यामुळें जो निर्धन झाला त्याची पत्नी व इतरही सर्व प्रकारचें द्रव्य हीं स्वामिरहित होऊन दासाच्या धन्याकडेस जावयाचीं असतात.** पांचही पाण्डव दुर्योधनाचे दास आहेत, व तूं त्या दासांचें धन आहेस. म्हणून कुन्तीपुत्र तुझे स्वामी नसून, धृतराष्ट्रपुत्र हे तुझे प्रभु आहेत. सबब, दुर्योधनाच्या पत्नीचीं चरणसंवाहन केशप्रसाधनादि कृत्यें करण्यास तूं तयार हो! किंवा स्वतःच्या पतीच्या जितत्वानें आपण जिंकिले गेलों नाहींत असें जर तुला वाटत असेल, तर तूं पतिहीन तरुणी आहेस. वाटेल त्याशीं पुनः लग्न कर! किंवा नवऱ्याचा कांच तरी तुझ्यामागें कशाला हवा? इतर संभोगेच्छु स्त्रियांप्रमाणें खुशाल स्वैरिणी हो! व कामचार मांड! हे पाण्डव षण्ढतिलासारखे निरुपयोगी आहेत." याप्रमाणें कर्णानें भीष्मद्रोणासारखे अतुल तेजस्वी पाण्डवपक्षैकपाती महात्मे सभेंत असतांना आणि भीमार्जुनासारखे बलसागर व श्रेष्ठ धनुर्धर म्हणून गाजलेले वीर ऐकत असतांना द्रौपदीस उद्देशून अगदीं निर्भयतेनें, निर्ममतेनें, निःशङ्कतेनें, निर्दयतेनें आणि निपट औद्धत्यानें भर सभेंत भाषण केलें.

---

# ३

# प्रतिज्ञापर्व.

सभापर्वानन्तर कर्णाचा सम्बन्ध वनपर्वांत येतो. दातृत्वांत बळीची बरोबरी करणारा, बळीपासून कर्णापर्यन्त ज्या अनेक पिढ्या होऊन गेल्या त्यांत एकही झाला नाहीं. दहा हजारांत वक्ता

**घोषयात्रा.**

एखादा तरी निघतो; परन्तु दाता हा क्वचित्च जन्मास येतो. कर्णानें मात्र दातृत्वाची इतकी कमाल केली कीं, त्यामुळें बळीचें चालत असलेलें नांव लोपून कर्ण स्वतःच उपमान झाला. कर्णाच्या दातृत्वाचीं उदाहरणें महाभारतांत कांहीं फारशीं नाहींत; परन्तु जीं कांहीं थोडीं हाताच्या बोटावर मोजण्या इतकीं आहेत तीं पाहिलीं म्हणजे, मन थक्क होऊन जातें. अशाच पैकीं एक उदाहरण वनपर्वांत आहे. तें देण्यापूर्वी कर्णानें दातृत्वाचें व्रत स्वीकरण्यास काय कारण झालें हें सांगतों. पांडवांचा वनवास संपण्याच्या सुमारास ते द्वैतवन नामक सरोवराजवळ वसतीस येऊन राहिले होते. तेथेंच क्रीडा करण्यासाठीं, शिकारीसाठीं, तत्कालीन रीतीप्रमाणें स्मारण ( म्हणजे गाई बैलांची नोंद ) करण्यासाठीं व मुख्यतः स्वतःच्या राजैश्वर्यानें सस्त्रीक पांडवांस दिपवून टाकून हिणविण्यासाठीं, दुर्योधन राजा सरदार, सानुज, सशकुनि सांगेश आणि सकटक असा त्या द्वैतवन नामक सरोवराप्रत प्राप्त झाला. तेथील स्मारणाचें काम झाल्या नंतर ही मंडळी शिकार करित पुढें चालूं लागली. या प्रमाणें रम्य वनें आणि उपवनें हिंडत हिंडत दुर्योधन राजा प्रत्यक्ष द्वैतवन सरोवराजवळ गेला. तें सरोवर भ्रमरांनीं आच्छादित

असून मयूरपक्ष्यांच्या ध्वनीनें गजबजून गेलें होतें. त्या सरोवरोच्या कांठीं सांतवण, उंडणी, आणि बकुळ या वृक्षांची दाट झाडी होती. याच सरोवरासन्निध एका निवासस्थानांत द्रौपदीसह पांडव राहत होते. दुर्योधन राजा जलकेलि करण्यासाठीं सैन्यासह या सरोवरांत उतरला. याच वेळीं चित्ररथ नांवाचा गंधर्व अप्सरागणासमवेत आपल्या अनुयायांसह जलक्रीडा करण्यासाठीं दुर्योधनापूर्वीच येऊन दाखल झाला होता. त्यामुळें इतर गंधर्वांनीं दुर्योधनाच्या सैन्यास पाण्यांत उतरण्याची बंदी केली, आणि म्हणून तेथें या दोन सैन्याचें युद्ध झालें. त्यांत दुर्योधनाचे वीर हरले. कारण गंधर्वांच्या मायावी युद्धामुळें दुर्योधनाच्या एकेका योद्ध्याशीं दहा दहा गंधर्व युद्ध करीत आहेत असें कौरवसेनेला वाटलें. त्यामुळें ते वीर भयभीत होऊन रणांतून पळत सुटले. याप्रमाणें दुर्योधनाच्या सेनेची दाणादाण उडून गेली. तरीही आपला चरित्रनायक कर्ण मात्र रणांमध्यें निश्चल उभा राहिला होता. कर्णाचा वध करण्यासाठीं हजारों गंधर्व त्यावर धावून गेले, आणि त्यावर खड्ग, पट्टे, शूल, आणि गदा ह्यांची सर्व बाजूंनीं सारखी वृष्टी केली. कांहींनीं त्याच्या रथाचें जूं मोडून टाकिलें, कांहींनीं ध्वज पाडिला, कांहींनीं दांडी तोडली, कांहींनीं अश्व मारिले, कित्येकांनीं सारथ्याला परलोक दाखविला, कांहीं जणांनीं छत्र नाहींसें केलें, कांहींनीं रथाचें कवच फोडून टाकिलें व कांहींनीं रथाचें बंधन तोडिलें. या प्रमाणें कर्णाचा रथ सर्वतोपरी भग्न झाल्यानें त्यानें त्या रणांतून पलायन केलें. पुढें गंधर्वांनीं दुर्योधनादि शंभर भ्रात्यांस कैद केलें. हें वर्तमान धर्मराजास समजतांच त्यानें भीमार्जुनास पाठवून गंधर्वांचा पराभव करविला.व दुर्योध-

नाची मुक्तता केली. गंधर्वांनीं दुर्योधनासमक्ष त्याच्या आगमनाचें नीच कारण पांडवांस कळविलें. परंतु दयासागर धर्मराजानें तिकडेस मुळींच लक्ष दिलें नाहीं. या अपमानाबद्दल दुर्योधनास फारच वाईट वाटलें. व भीष्मद्रोणादींनीं कर्णाचा फारच उपहास केला. तो ऐकून कर्ण दुर्योधनाला म्हणाला, " भीष्म आपला द्वेष करितात व पांडवांची प्रशंसा करितात, हें मला मुळींच सहन होत नाहीं. या साठीं तूं मला सैन्यासह जाण्याची अनुज्ञा दे. म्हणजे चौघा पांडुपुत्रांनीं मिळून जी पृथ्वी दीर्घ प्रयत्नांनीं जिंकिली ती सर्व पृथ्वी मी एकटाच पर्वत, वनें, अरण्यें यांसह सहज जिंकीन. सन्माननीयांची निंदा आणि निंद्यांचा सन्मान करणाऱ्या या वृद्ध भीष्माला हा माझा पराक्रम पाहून स्वतःचा धिक्कार करण्याची पाळी येऊं दे!" हें कर्णाचें भाषण ऐकून दुर्योधनाला पराकाष्ठेचा आनंद झाला, व त्यानें कर्णाच्या स्वारीची सत्वर तयारी करविली.

**कर्णाचा दिग्विजय.**

२. याप्रमाणें दुर्योधनानें तयारी केल्यावर प्रचंड सैन्य बरोबर घेऊन कर्णानें पहिल्या प्रथम द्रुपदाच्या रम्य नगरीला वेढा दिला. व तें काबीज केलें. द्रुपदापासून पुष्कळशी खंडणी घेऊन त्यानें उत्तर दिशेकडील राजांना जिंकलें. भगदत्ताला शरण आणून कर्ण हिमालय पर्वताकडे गेला. तिकडील राजांनाही त्यानें जिंकिलें. त्यांच्यापासून पुष्कळशी खंडणी घेऊन कर्णानें नेपाळावर स्वारी केली. तदनंतर तो पूर्वदिशेकडे वळला, व त्यानें अंग, वंग, कलिंग, शुंडिक, मिथिल, मागध, कर्कखंड, आवशिर, योध्य, आणि अहिच्छत्रा हे प्रदेश जिंकले. याप्रमाणें पूर्व दिशा

जिंकिल्यावर त्यानें आपला मोर्चा वत्सभूमीकडे वळविला. व वत्सभूमी जिंकून, मोहनगर, त्रिपुरी व कोसला या राजांपासूनही त्यानें कर घेतला. नंतर कर्णानें दक्षिणेवर स्वारी करून मोठमोठीं राज्यें पादाक्रांत केलीं. त्यानें रुक्मीला शरण आणिलें. व पांड्य, श्रीशैल, केरळ, नील, वेणुदारिसुत, इत्यादि श्रेष्ठ श्रेष्ठ राजांनाही दातीं तृण धरावयास लाविलें. कर्णानें शिशुपालाचा पराभव केला व अवंत्यदेशही जिंकिला. नंतर वृष्णींना भेटून तो पश्चिम दिशेकडे निघाला व पश्चिमेकडील यवन, बर्बर, वगैरे राजांकडूनही खंडणी घेतली. पूर्व, पश्चिम व दक्षिण या तीन दिशांकडील सर्व पृथ्वी त्यानें जिंकून म्लेंच्छ, अरण्यवासी, आणि पर्वतनिवासी, लोकही त्यानें जिंकिले. कर्णानें भद्र रोहितक, आग्नेय मालव, आणि नग्नजित हे गणही युद्धांत पराभूत केले. याप्रमाणें सर्वत्र विजय संपादून कर्ण हस्तिनापुराला परत आला. तेव्हां कर्णाची फारच प्रशंसा झाली. त्यानें वसूल केलेली अमित खंडणी व धन हीं पाहून धृतराष्ट्रालाही फार आनंद झाला. ती अगणित संपत्ति पाहून दुर्योधन राजा मनामध्यें राजसूय यज्ञ करण्याचा विचार करूं लागला, व कर्णासह आपल्या भ्रात्यांना म्हणाला, " सर्व पांडवांचा वध करून राजसूयनामक यज्ञ माझ्या हातून केव्हां बरें होईल ? " हें ऐकून कर्णानें उत्तर दिलें, "राजा माझी प्रतिज्ञा ऐक. अर्जुनाचा वध माझ्या हातून होई पावेतों मी दुसऱ्याच्या हातून आपले पाय धुवून घेणार नाहीं. मांसभक्षण करणार नाहीं, मद्यपानही वर्ज करीन, आणि कोणीही कांहीं याचना केली तर मी त्याला नकार सांगणार नाहीं. " याप्रमाणें अर्जुनवधाची कर्णाची प्रतिज्ञा ऐकून कौरव हर्षनिर्भर झाले. व पांडवांना ही प्रतिज्ञा कळल्यावर कर्णाचें अभेद्य कवच व त्याचा

अद्भुत पराक्रम हीं त्यांच्या मनांत घोळूं लागलीं. व ते उद्विग्न होऊन चिंताग्रस्त झाले.

कर्णाचें दातृत्व.

३. कर्णानें दातृत्वाची प्रतिज्ञा किन्निमित्त केली,हें वर विस्तारें-करून सांगितलें आहे. आतां कर्णाच्या दातृत्वाचें एक ठळक उदाहरण सांगतों. कर्णाच्या अंगावर जोंपर्यंत अभेद्य कवच आहे तोंपर्यंत अर्जुनाच्या हातून देखील कर्णास मृत्यु येणार नाहीं; हें अर्जुनाचा पिता जो इंद्र यानें जाणून पांडवांच्या वनवासाचें बारावें वर्ष संपून तेरावें वर्ष लागण्याच्या सुमारास कर्णाकडे कवचकुंडलांची याचना करण्याचा विचार केला. हा इंद्राचा अभिप्राय कर्णपिता जो सूर्य त्याला समजला. तेव्हां त्यानें ब्राह्मणरूपानें रात्रीं ब्राह्मण-भक्त, सत्यवादी व वीर अशा कर्णाच्या स्वप्नामध्यें येऊन त्याला सांगितलें कीं, " तूं दाता आहेस हें मला माहित आहे. तूं कोणालाही नाहीं म्हणत नाहींस. हें जाणून स्वतः इंद्र कवचकुंडलें मागण्याकरितां उदईक तुजजवळ येणार आहे. त्याला तूं आपलीं कवचकुंडलें देऊं नकोस. कारण हे कर्णा! जर तुला आपलें जीवित प्रिय असेल तर ह्या रत्नमय व अमृतोद्भव कवच कुंडलांचें रक्षण कर. जोंपर्यंत तूं कवच-कुंडलासह आहेस तोंपर्यंत तूं संग्रामामध्यें अवध्य आहेस. देहासहवर्तमान प्राप्त झालेलीं हीं कवचकुंडलें जर तूं देऊन टाकशील तर तूं मृत्यूच्या तावडींत तेव्हांच सांपडशील. हें माझें वचन तूं अमान्य करूं नकोस." यावर कर्ण म्हणाला, " पराकाष्ठेचें प्रेम दर्शविणारे व ब्राह्मणवेष धारण केलेले आपण कोण आहांत ? " ब्राम्हण ह्मणतो, " बा कर्णा! मी सूर्य असून

प्रेमामुळें तुला दर्शन दिलें आहे." कर्ण म्हणतो, "हे भगवन्! माझें प्रिय व्हावें अशी जर आपली इच्छा असेल तर मला आपण माझ्या व्रतापासून निवृत्त करूं नये. ब्राह्मणांना मी आपले प्राण देखील अर्पण करीन. पांडवांच्या हितासाठीं ब्राह्मणवेषानें जर इंद्र कवचकुंडलांच्या याचनेसाठीं आला, तर मी तीं त्याला निःसंशय देईन. अपकीर्ति होऊन प्राणरक्षण करण्यापेक्षां कीर्ति-युक्त मरण प्राप्त होणें हें माझ्या सारख्याला अधिक उचित आहे. पांडवांच्या हितार्थ इंद्रानें केलेली कवचकुंडांलची याचना पांड-वांना अपकीर्तिप्रद होऊन माझी कीर्ति त्रैलोक्यामध्यें वृद्धिंगत होण्याला कारणीभूत होईल. **जगतामध्यें पुरुषाला कीर्ति जिवंत ठेवित असून अपकीर्ति त्याचा नाश करीत असते.** म्हणून शरीरासहवर्तमान उत्पन्न झालेलीं हीं कवचकुंडलें देऊन मी अक्षय कीर्ति संपादन करीन. ब्राह्मणांना यथाविधि दान देईन, संग्रामयज्ञामध्यें शरीराचें यथाविधि हवन करीन; अत्यंत दुर्घट पराक्रम करीन, जीवितेच्छु पुरुषांना युद्धामध्यें अभय देईन, बाल, वृद्ध व द्विज यांना मोठ्या संकटांतून सोडवीन व स्वर्गप्रापक अशी अनुपम कीर्ति संपादन करीन. अर्जुनाचा बाप इंद्र या सारखा याचक ज्या अर्थी उदईक मला प्राप्त होणार आहे, त्या अर्थी मीं असली अमूल्य संधि कां दवडावी? अनंत काळ पर्यंत वांचून तरी काय करावयाचें आहे? करितां हे प्रभो! आपण मला प्रतिज्ञा-भ्रष्ट करण्याचा उपदेश करूं नये. व मीही तो ऐकणार नाहीं." हें ऐकून सूर्यान उत्तर केलें, "हे कर्णा! तूं आपल्या हट्टानें सुहृद, पुत्र,भार्या, माता, पिता, आणि स्वतः यांचें अकल्याण करून घेऊं नकोस. शरिराला न दुखवितां इहलोकीं यशःप्राप्ति व परलोकीं स्थिर कीर्ति प्राण्यांना हवी असते. प्राण वेंचून जर कीर्तीची

अपेक्षा तूं करीत असशील. तर दोहींचाही निःसंशय नाश होईल. मरणा नंतर भस्मीभूत झालेल्या प्राण्याला कीर्तीचा काय उपयोग आहे? तूं माझा भक्त असल्यामुळेंच मीही तुला कळकळीनें सांगत आहें. कारण भक्तांचें रक्षण करणें हें माझें कर्तव्य आहे; व यांत कांहीं देवगुह्यही आहे तें तुला पुढें योग्य समयीं कळेल. आणि म्हणून तूं हरप्रयत्नानें कवचकुंडलांचें रक्षण कर. इतकेंही करून जर तूं कवचकुंडलें देणारच असशील तर इंद्रापासून कवच कुंडलांच्या मोबदला म्हणून शत्रुघातक वासवी शक्ति तरी मागून घे." यापैकीं वासवी शक्ति फक्त मागून घेण्याचें कर्णानें कबूल केलें.

४. दररोज दोनप्रहर दिवस येईपर्यन्त कर्ण उदकामध्यें उभा राहून सूर्याचा जप करीत असे.

**कर्णनामप्राप्ति.** त्यावेळीं त्याला ब्राह्मणांना आदेय असें कांहीं नसे. त्यामुळें त्या वेळेस पुष्कळ ब्राह्मण दक्षिणेच्या इच्छेनें कर्णाजवळ येत असत; पूर्व संकल्पाप्रमाणें इंद्रही एके दिवशीं ब्राह्मणवेषानें याचनार्थ तेथें प्राप्त झाला. व त्यानें कर्णाजवळ कवचकुंडलांची याचना केली. कवच-कुंडलांशिवाय इतर कोणतीही वस्तु मागून घेण्यास कर्णानें त्या ब्राह्मणास परोपरीनें विनविलें, परंतु तें सर्व व्यर्थ गेलें. कवच-कुंडलांशिवाय तो दुसरें कांहींच पसंत करीना. शेवटीं निरुपाय होऊन कर्णानें सूर्यास कबूल केल्याप्रमाणें वासवी शक्तीच्या विनिमयानें त्या ब्राह्मणरूपी इंद्राला आपल्या अंगावरील कवच कुंडलें कर्णानें देऊन टाकिलीं. कर्णाच्या ह्या दातृत्वानें इंद्र प्रसन्न होऊन, त्यानें त्याच्या अंगावरील कवच छेदून टाकिल्यामुळें त्याला जी विरूपता प्राप्त झाली होती ती सर्व नाहींशी करून त्याचा वर्ण व त्याचें तेज त्याला पूर्वीप्रमाणें प्राप्त करून दिलें

अक्षय अमृतस्रवी कुंडलें, कान कापून दिल्यामुळें, त्या सूतपुत्राला कर्ण हें नांव प्राप्त झालें. याप्रमाणें कर्ण, कवचकुंडलांना मुकल्यानें पांडवांना आनंद झाला व कौरव दुखा:कुल झाले.

**कर्णाचा शस्त्रसंन्यास.** ५. पाण्डवांचा वनवास संपल्यावर उत्तरगोग्रहणप्रसङ्गीं अर्जुन जेव्हां प्रगट झाला, तेव्हां 'पाण्डव,' प्रतिज्ञेप्रमाणें पूर्ण तेरा वर्षांनन्तर प्रकट न होतां आधींच झाले, अशी तक्रार कर्णदुर्योधनांपुढें आणिली. पाण्डवही पुढें उपप्लव्य मुक्कामीं राहून राज्यभाग घेण्याचा विचार करूं लागले. व त्यांनीं कांहीं सैन्यही जमविलें. नंतर द्रुपदपरोहिताला सामर्थ धृतराष्ट्राकडेस पाठविलें.त्यानें तेथें जाऊन पाण्डवांचा भाग पाण्डवांस देण्यास धृतराष्ट्रास सभेंत विनन्ती केली. ही विनन्ती ऐकिल्यावर कर्ण त्या द्रुपदपुरोहितास म्हणतो, ''शकुनीनें युधिष्ठिराला द्यूतांत जिंकिलें, यांत अधर्म काय? हें आम्हांस कळत नाहीं. आमच्या मतें आम्हीं कांहींच अधर्म केला नाहीं. वनवासाच्या करारप्रमाणें धर्म मात्र वागत नाहीं. कारण तेरा वर्षे भरण्याच्या पूर्वींच तो उघडकीस आला. म्हणून त्याचा करारच पूर्ण झाला नाहीं, व मत्स्य आणि पांचाळ यांच्या बळावर आम्हांला भिवडवून राज्याची वाटणी मागत आहे. परन्तु अशा रीतीनें आम्ही मुळींच भिणार नाहीं. धर्मार्थ म्हणून दुर्योधन राजा सर्व राज्यही देऊन टाकील. परन्तु पाण्डवांना भिऊन सूच्यग्र भूमीही तो त्यांना देणार नाहीं. पाण्डवांना जर भाग हवा असेल तर त्यांनीं पूर्व करारप्रमाणें वनवासाचीं तेरा वर्षें पूर्ण करावींत व आपला भाग हक्कानें मागून घ्यावा. एरव्हीं मूर्खपणानें व अधर्मानें राज्याचा अभिलाष त्यांनीं धरूं नये.

इतकेंही करून जर ते ऐकत नसले तर युद्धार्थ आमची सिद्धता आहे." याप्रमाणें दुर्योधनपक्षीयांचा दृढ निश्चय पाहून द्रुपदपुरोहित परत गेला. तेव्हां धर्मानें संजयास संधीसाठीं पाठविलें. संजयानें पाण्डवांच्या दैवी व मानुषी शक्तीचें यथास्थित वर्णन केल्यानें धृतराष्ट्र जयाविषयीं थोडासा साशंक झाला. तेव्हां कर्ण म्हणाला. "राजा! घाबरण्याचें कांहीं एक कारण नाहीं. पूर्वी मी परशुरामाजवळ. 'ब्राह्मण आहें' असें सांगून ब्रह्मास्त्र संपादन केलें. पुढें माझें कपट त्यांना कळल्यावर त्यांनीं फक्त, 'अन्तकाळीं हें तुला स्फुरणार नाहीं' असा मला शाप दिला. याचा अर्थ असा कीं, 'अन्तकालापर्यंन्त स्वाभ्यस्तास्त्राची स्मृति मला सोडणार नाहीं व त्याचा प्रभाव मी गाजवीन. म्हणजे तें जोंपर्यंत मला स्फुरत आहे तोंपर्यंत मला अन्तकालच नाहीं. म्हणून अर्जुनाचा वध मी केव्हांच करून टाकीन. परशुरामाच्या कृपेनें पांचाल, करूषक, मत्स्य व पुत्रपौत्रांसह पार्थ यांचा मी क्षणांतच लय करून टाकीन. भीष्मद्रोणादिकांना तुजजवळच असूं दे." हें भाषण ऐकून भीष्म म्हणाले, "राजा धृतराष्ट्रापूर्वीचे जे नरनारायण ऋषी होऊन गेले, तेच हे अर्जुन व वासुदेव यांच्या रूपानें हल्लीं अवतरले आहेत. एक रथि व एक सारथि होऊन जेव्हां ही जोडी रणांगणावर उभी राहील, तेव्हां एकही वीर हिच्यापुढें उभा राहूं शकणार नाहीं. पांडवांना राज्य न देणें आणि पूर्व विरुद्धाशीं साम्य न करणें हें कर्णाचें मत व हा त्याचा आग्रह खरोखरी चांगला नव्हे. हा सूतपुत्र ह्या योगानें सर्वांना लयाला पोंचवील. याचा गुरुशापाच्या योगें सर्वस्वी नाश झालेला आहे. एकेका पांडवानें जें कर्म केलेलें आहे, तेंही याला दुष्कर आहे. अशा स्थितींत हा सर्व पांडवांचा पराजय तो काय करणार? उत्तर-

गोग्रहणप्रसंगीं हा कां पळून गेला ? याचें वस्त्र पांडवांपकीं एका पार्थानें हरण केलें, तेंव्हां याचा पराक्रम कोठें लपला होता ? घोषयात्रेंतील भीमार्जुनांचा पराक्रम हा कसा विसरला ? गंधर्वांकडून दुर्योधनाची मुक्तता कोणीं केली ? या पळपुटयाच्या जीवावर का दुर्योधन पांडवांचा पराभव करणार? राजा धृतराष्ट्रा! हा कर्ण कौरवांना बुडविण्याला बसला आहे. ज्यानें खांडव वन अग्नीस अर्पण केलें, ज्यानें श्रीशंकराशीं युद्ध केलें, ज्यानें निवात-कवचांना नाहींसें करून टाकिलें, त्या अर्जुनाचा पराभव हा पामर काय करणार ? शिवाय याच्याहून अनंतपट अधिक परा-क्रमी वीरांचा नाश करण्यास समर्थ असणारे प्रभु श्रीकृष्ण त्या अर्जुनाचें संरक्षण करीत आहेत, हें याला कां दिसत नाहीं ?"

"कर्णा ! ज्या सर्पमुख बाणाची भात्यामध्यें तूं रोज पूजा करीत आहेस, तो अर्जुनाच्या बाणवृष्टीनें तेव्हांच चूर्ण होऊन जाईल."

हें भीष्माचें भाषण ऐकून कर्ण अतिशय संतापून म्हणाला, "अर्जुनाचें शौर्य व कृष्णाची भक्तवत्सलता या गोष्टी मला चांग-ल्या प्रकारांनीं विदित आहेत. भीष्माच्या मनांतून मात्र आमचा वारंवार उपहास करावा हीच आवड आहे. परंतु वारंवार असें टोंचणें बरें नव्हे. उत्तम व कर्णमधुर ध्वनि निघण्यासाठीं तंबो-ऱ्याची तार खेंचणें अवश्य असतें, परंतु ती वाजवीपेक्षां अधिक खेंचली तर तुटून जाते, ही साधी प्रचारांतील गोष्ट आहे. हा जो वारंवार माझा मानभंग होतो त्याचें फळ मी आतांच सांगतों, कीं, हा वृद्ध भीष्म जोंपर्यंत जीवन्त आहे, तोंपर्यंत मी शस्त्र धारण करणार नाहीं. हा मरेपर्यंत मी शस्त्रसंन्यास केला आहे. हीच माझी प्रतिज्ञा. या असल्या मानभङ्गाच्या जागीं बसण्यांत तरी काय अर्थ आहे ? मी या सभेचाही त्याग करून उठून जातों, व

पुनः स्पष्ट सांगतों कीं, हे भीष्मा ! जेव्हां तूं रणांत पतन पावशील तेव्हांच मी शस्त्र धारण करून माझा पराक्रम जनास दाखवीन. " इतकें बोलून मानी व तेजस्वी कर्ण सभेंतून उठून गेला. पुढें भीष्म शरपञ्जरीं पडेपर्यंत खरोखरीच त्यानें शस्त्र धारण केलें नाहीं. हा प्रकार सञ्जयानेंच अवलोकन करून द्रुपदपुरोहिताप्रमाणें तोही निरुपाय होऊन परत गेला.

**धर्मास शल्याकडून वरप्रदान.**

६. दुर्योधनाच्या आश्रयानें व दैवी सङ्कल्पानें पाण्डवांचा गाढ द्वेष केला हें कांहीं खोटें नाहीं. भीष्मद्रोणापेक्षां कर्णच पाण्डवांस अधिक भयप्रद वाटत होता. पाण्डवांना वनवासामध्यें कर्णाच्या धाकानें रात्रंदिवस झोंप येत नसे. वनवासाचे तेरा महिने पूर्ण झाल्यावर, एके दिवशीं इतर चौघांनीं धर्मराजास प्रगट होण्याबद्दल सल्ला दिली; परंतु त्यावेळीं त्यानें कौरवपक्षीय इतर योध्यांपेक्षां कर्णाची धास्ती आपणांस किती आहे याचें सोपपत्तिक विवेचन केलें. व कर्णाच्या प्रतिकारार्थ व्यासांच्या उपदेशावरून अर्जुनास हिमालयावर पाठविलें. ही साद्यन्त हकीकत पुढें उपसंहारांत येणारच आहे. अर्जुनानें हिमालय पर्वतावर पांच वर्षें राहून निरनिराळ्या देवांकडून अपार व प्रतिभाशाली अस्त्रसम्पत्ति प्राप्त करून घेतली. यावरून हें उघड होतें कीं, " भीष्मद्रोणांचें वात्सल्यप्रेम अवर्णनीय असल्यानें त्याचा पराजय करण्यास आपणांस मुळींच अडचण पडणार नाहीं. परंतु पराक्रमानें तत्तुल्य असणारा कर्ण कसा पराजित होईल ? " याची पाण्डवांस अहर्निश काळजी लागून राहिली होती. किम्बहुना ही काळजी खुद्द भीष्मद्रोणांसही होतीच. म्हणू-

नच ते जेव्हां तेव्हां कर्णाचा मानभङ्ग करून **तेजोवध** करीत असत. शल्य हा माद्रीचा बंधु असल्यानें नकुळसहदेवांचा सख्खा मामा होता. भारतीय युद्धासाठीं या भरतभूमींतील कौरव-पाण्डवांचे हितकर्ते राजे त्यांना सहाय्य करण्यास निघाले होते. त्यांत अर्थातच शल्य हा आपल्या भाच्यांना म्हणज पाण्डवांना मदत करण्यास निघाला होता. परंतु दुर्योधनकृत मानसन्मानानें तो इतका मोहून गेला कीं, त्यानें दुर्योधनाचाच पक्ष स्वीकारला. सकृद्दर्शनीं हा मोठाच लाभ झाला असें जरी दर्योधनास वाटलें असलें, तरीही परिणामीं शल्यच फार घातक झाला. कारण दुर्योधनाचा पक्ष स्वीकारल्या नन्तर धर्मराजा शल्यास भेटला. तेव्हां त्यानें शल्याजवळून असें वरप्रदान मागून घेतलें कीं, "दुर्योधनाच्या सेनेचा सेनापति जेव्हां कर्ण होईल, तेव्हां तो तुम्हांला कृष्णाप्रमाणें मान देत असल्यानें कर्णाचें सारथ्य करावयास विनवील; त्यावेळी तुम्ही फक्त कर्णाचा वारंवार अपमान करून त्याला निरुत्साहित करा. एवढेंच आमच तुमच्यापाशीं मागणें आहे." शल्यानें हें मागणें कबूल केलें व आपलें वचन अक्षरशः पाळिलें. न्याय्य दृष्टीनें शल्याची ही कृति बिभीषणापेक्षांही अत्यंत नीच होय. कारण हितशत्रु हा केव्हांही फारच भयङ्कर होय.



# ४
# सन्धिपर्व.

**कृष्णकर्ण-संवाद.**

१. दुर्योधनानें आपणांस आपल्या राज्याचा भाग द्यावा म्हणून धर्मराजानें एकंदर तीन दूत दुर्योधनाकडेस सन्धीसाठीं पाठविले. त्यांपैकीं द्रुपद-पुरोहित आणि सञ्जय यांची हकीकत मागील भागांत सांगितली. आतां तिसरा व महत्त्वाचा दूत म्हणजे भगवान् श्रीकृष्ण, याची हकीकत सांगतों. ही कृष्णशिष्टाई उद्योगपर्वांत आहे. कृष्ण, कौरवसभेंत गेल्यावर हस्तिनापुरांतच त्याला कैद करून टाकावें म्हणजे पाण्डव आपोआपच निर्बल होतील, ही साहसाची पण शूरपणाची युक्ति कर्णाच्याच सुपीक डोक्यांतून प्रथमतः निघाली. परन्तु पुढें विश्वरूपदर्शनानें हा बेत जागच्या जागींच राहिला. श्रीकृष्ण कौरवसभेंतून, परत जाण्यास, सर्वांचा निरोप घेऊन, निघाल्यावर त्यांनीं कर्णास आपल्याबरोबर रथावर घेतलें. ह्या प्रसङ्गीं कृष्णकर्णाचें फार महत्त्वाचें भाषण झालें. कर्णाच्या आयुष्यांत अत्यन्त महत्त्वाच्या गोष्टी ज्या कांहीं घडल्या त्यांत हा प्रसङ्ग अग्रस्थानीं शोभण्यासारखा आहे.

कृष्णः—कर्णा! तूं वेदवेदार्थवेत्ता आहेस. धर्माचें ज्ञान तुला पूर्णपणें आहे. लग्नापूर्वी म्हणजे कौमारावस्थेंत जी सन्तति होते, तिला कानीन असें म्हणतात. व त्या कुमारीचा पाणिग्रहणकर्ता जो पति तोच या कानीन मुलाचा पिता होय. हे धर्मशास्त्राचे सिद्धान्त तुला ठाऊक आहेतच. कर्णा! तूं सूर्यापासून कुन्तीला तिच्या कुमारावस्थेंत झालेला तिचा कानीन पुत्र असल्यानें तूं क्षत्रिय-

पुङ्गव, चन्द्रवंशीय,भरतकुलोत्पन्न कौन्तेय आहेस.तूं कांहीं राधेय नाहींस. पाण्डु हाच तुझा पिता आहे. धर्मादि पंच भ्राते हे तुझे धाकटे बंधु असून त्यांचा त्वां सांभाळ करावा हेंच उचित आहे. पित्याच्या बाजूनें पाण्डव तुझे बन्धु असून मातेच्या बाजूनें आम्ही वार्ष्णेय, तुझे भ्राते आहोंत. तूं मजबरोबर चल. म्हणजे युद्धिष्ठिरास हें तुझें नातें कळवितों. तूं त्याचा ज्येष्ठ भ्राता असल्यानें पांच पाण्डव, पांच द्रापदेय, वीर अभिमन्यु, अन्धक-वृष्णिवंशज-वीर–यादव हे तुझे सर्व अङ्कित होतील. तुला राज्याभिषेक होईल. व त्रिभुवनसुन्दरी जी द्रौपदी तिचाही तुला वर्षांतून दोन महिने उपभोग मिळेल. तूं राजा झालास म्हणजे, धर्मराजा तुला वारा घालील, भीमसेन तुजवर छत्र धरील, अर्जुन तुझा सारथी होईल, अभिमन्यूसारखा वीर तुझ्या आज्ञेंत राहील,नकुल, सहदेव, पांच द्रौपदीपुत्र, पाञ्चाल व अन्धक तुझे अनुचर होतील. कुन्तलासह द्रविड, आन्ध्र, तालचर, चूचुप व वेणुप हे तुझ्या पुढें चालतील. सूत व मागध तुझा विजयघोष करितील. याप्रमाणें ऐश्वर्यसम्पन्न व मूर्धाभिषिक्त असा तूं राजा होऊन कुंतीस आनन्द दे! आणि दुर्योधनाच्या पक्षाचा त्याग कर.

कर्णः–कृष्णा! तूं मला जें हें प्रेमानें सांगितलें आहेस तें माझ्या कल्याणाचें आहे. धर्मशास्त्राप्रमाणें मी पण्डूचा पुत्र आहें ही गोष्ट मला कबूल आहे. मी कौन्तेय आहें हें सुद्धां मला ठाऊक आहे, परन्तु कुन्तीच्या अन्तःकरणांत मजविषयीं जें पुत्रप्रेम असावयास पाहिजे तें मात्र मुळींच नाहीं. मी उपजतांच कचऱ्याप्रमाणें तिनें माझा त्याग केला, व म्हणूनच चार लोकांत कुलाबद्दलचा उल्लेख निघाला कीं, मला खालीं पाहणें भाग पडतें. यापेक्षां तिनें बाळपणींच जर मला मारून टाकिलें असतें, तर फार उत्तम झालें

असतें. शिवाय कृष्णा ! जी अप्रसूत असूनही मला पाहतांच जिला प्रेमोद्रेकानें पान्हा फुटला, व तें स्तन्य मीं बाळपणीं प्राशन केलें; जिनें मला करतळस्थ फोडाप्रमाणें वागविलें, जिनें माझें मलमूत्रही काढिलें, व स्वतःच्या प्राणापेक्षांही मजवर अधिक प्रेम करून जिनें मला नांवारूपास आणिलें त्या राधेचा मीं धर्मवेत्त्यानें कसा बरें त्याग करावा ? कृष्णा ! तूं जसा यशोदेचा त्याग केलास तसा मी राधेचा त्याग करणार नाहीं. अधिरथाचेंही प्रेम मजवर राधेप्रमाणेंच अढळ आहे. पुत्रप्रेमानें त्यानें माझे जातकर्मादि सर्व संस्कार शास्त्रोक्त रीतीनें केलेले आहेत. त्याच्याच कृपेनें गुणवती व रूपवती अशा अनेक स्त्रियाही मीं वरिल्या आहेत. तात्पर्य, अधिरथाचाही त्याग माझ्यानें करवणार नाहीं. आतां धर्मराजाचा पक्ष स्वीकारण्या-बद्दल जें तुझें सांगणें आहे, तेंही अव्यवहार्य आहे. भीष्म, द्रोण हे मनांतून आपला द्वेष करितात, हें दुर्योधन जाणून आहे. तो फक्त माझ्या जिवावर या इतक्या उड्या मारीत आहे. आज तो फक्त नांवाचा राजा आहे. खरें खरें राजैश्वर्य सतत तेरा वर्षेंपर्यंत मींच भोगिलेलें आहे. आजपर्यंत त्याचें अन्न खाल्लें, त्याचें ऐश्वर्य भोगिलें, हें एवढें युद्ध चेतविलें आणि आतां ऐन-समयीं मीं त्याला सोडून द्यावें, म्हणजे कृतघ्नतारूपी नरकांत जीवन्तपणींच पचत राहावें, असा उपदेश तूं मला कसा करीत आहेस ? मी एवढेंच निक्षून सांगतों कीं, मला कोणीं त्रिभुवन देऊं केलें, किंवा प्राणघाताची भीति घातली तरीही मी दुर्योधनाशीं बेइमान होणार नाहीं. व विश्वस्त मित्राचा

विश्वासघात करणार नाहीं. जो जें मागेल तें त्यास द्यावें, हें माझें व्रत आहे. दुर्योधनानें अत्रुटित व आमरण मैत्री मजजवळ मागितली, आणि मीं त्यास ती दिली. आतां तें माझें वचन मिथ्या होणें शक्य नाहीं. दुर्योधनाचा पक्ष मीं सोडिला कीं, हें भारतीय युद्ध संपलेंच म्हणून समज. दुसरें, अर्जुनवधाचा मीं पण केलेला आहे. आणि आतां त्यासच जाऊन मिळल्यावर लोक मला उघड उघड असें म्हणतील कीं, "हा अर्जुनाच्या प्रभावाला भ्याला; व म्हणूनच यानें दुर्योधनाचा पक्ष सोडून दिला. असें झालें म्हणजे मज कृतघ्नाकडून दान घेण्याचेंही विप्र नाकारितील. याकरितां दुर्योधनाचा पक्ष सोडणें मला शक्य नाहीं. कृष्णा! तूं मला हिताची गोष्ट सांगतोस, हें मला कबूल आहे. राजा युधिष्ठिर मोठा धर्मात्मा आहे. त्याला जर तूं हें आमचें नातें कळविलेंस, तर तो स्वतः राज्य स्वीकारणार नाहीं. आणि मलाच सर्व राज्य अर्पण करून टाकील. म्हणून तूं कृपा करून आमचें हें नातें धर्मराजास कळवूं नकोस. व इतकेंही करून जर तूं कळविलेंस आणि धर्मराजानें मला आपली राज्यश्री अर्पण केली, तर मी ती दुर्योधनास देऊन टाकीन. दुर्योधनाकरितां द्रव्य, पुत्र, दारा आणि हा देह हे सर्वस्वीं म्यां सोडिले आहेत. परन्तु माझ्या मतें आम्हां सर्वांपेक्षां युधिष्ठिरच राज्याला अधिक पात्र आहे. हे कृष्णा! आतां थोडक्या दिवसांत दुर्योधनाचा शस्त्रयज्ञ सुरू होणार असून त्यांतील अध्वर्यु तूं होशील, व अर्जुन हा होता होईल. धृष्टद्युम्न व शिखण्डी हे अनुक्रमें द्रोण व भीष्म यांचा नाश करितील तेव्हां यज्ञावसान होईल, आणि भीमसेन जेव्हां दुर्योधनाला मारील तेव्हां हा शस्त्रयज्ञ समाप्त होईल. कृष्णा! तूं आतां कांहीं केलेंस तरी हें युद्ध थांबत नाहीं. आमचें तुजजवळ एवढेंच

मागणें आहे कीं, जे जे क्षत्रिय या रणांत मरण पावतील त्या त्या सर्वांना तूं सद्गति दे! केशवा! मी कुन्तीचा ज्येष्ठ पुत्र आहें ही गोष्ट सर्वथा गुप्त ठेवून कसेंही करून अर्जुनाला मजकडेस घेऊन ये, एवढेंच तुजपाशीं माझें पदर पसरून मागणें आहे. आतां कोणींही हें कौरवपांडवांचें घनघोर युद्ध थांबविण्यास समर्थ नाहीं. कारण या पृथ्वीचा सर्वस्वीं नाश होण्याची वेळ तुझ्या इच्छेनेंच येऊन पोंचली आहे. आणि शकुनि, दुःशासन व राजा दुर्योधन हे केवळ निमित्तमात्र आहेत. या युद्धांत सर्वांचा नाश होणार आहे. हे कृष्णा! मीं असें एक स्वप्न पाहिलें कीं, तूं, पांच पाण्डव, सात्यकि, कृतवर्मा, कृपाचार्य आणि अश्वत्थामा एवढ्या व्यक्तींशिवाय बाकींच्या सर्वांनीं तांबडीं पागोटीं घालून उंटावर किंवा उंटाच्या वाहनांत बसून दक्षिण दिशेकडेस प्रयाण केलें. पांचही पाण्डवांनींशुभ्र पोषाख केलेले असून युधिष्ठिर सहस्रस्तम्भयुक्त प्रासादाच्या शिखरावर चढून तेथें क्षीरपान करीत आहे.भीमसेन अस्थींच्या डोंगरावर चढलेला, तुजसह अर्जुन श्वेत गजावर आरूढ झालेला व नकुल सहदेव नरवाहनांत अधिष्ठित झालेले, असें मीं अवलोकन केलें. त्याचप्रमाणें ही सर्व पृथ्वी रक्तानें व आंतड्यानें आच्छादून गेलेली अशी मला दिसली. यावरून जिकडेस योगीश्वर कृष्ण व धनुर्धर पार्थ हे आहेत, तिकडेसच जय प्राप्त होणार ही माझी खातरी झालेली आहे.

कृष्णः—कर्णा! ज्या पक्षीं माझें भाषण तुला रुचत नाहीं, त्यापक्षीं तुमचा सर्वांचा संहारकाल जवळ आला हेंच खरें. **विनाशकाल जवळ आला म्हणजे विपरीत बुद्धि प्राप्त होऊन अन्यायच न्यायासारखा भासूं लागतो.**

कर्णः—कृष्णा ! युद्धापासून आमचीं मतें परावृत्त होत नाहींत, हें खरें आहे. माझ्या भाषणाचा तूं विषाद मानूं नकोस. परन्तु क्षत्रियाला योग्य तेंच मीं सांगितलें आहे. पुढें युद्धांत प्रेम राहणार नाहीं. म्हणून एकवार आपण कडकडून भेटूं या ! यानन्तर तुझी आमची प्रेमपूर्वक भेट स्वर्गातच होईल. कारण या समर-सागरांतून आम्हीं सुखरूप पार पडत नाहीं.

असें भाषण झाल्यावर कर्ण कृष्णाला कडकडून भेटला आणि कृष्णाच्या अनुज्ञेनें त्याच्या रथांतून उतरून आपल्या रथांत येऊन बसला व खिन्न मनानें हस्तिनापुराकडेस परत फिरला.

**कर्णकुन्तीसंवाद.**

२. श्रीकृष्णांची शिष्टाई व्यर्थ गेली, व ते, सन्धि न होतांच परत गेल्यावर भीष्मद्रोणादिकांस फार वाईट वाटलें. विदुर तर फारच कष्टी झाला, व त्यानें घरीं येऊन इत्थम्भूत हकीकत कुन्तीस निवेदन केली. तो म्हणाला, " हे कौरव फार दुष्ट आहेत.त्यांत धृतराष्ट्र आणि कर्ण या दोन व्यक्ति तर फारच दुरात्म्या आहेत, किम्बहुना या सर्व अनर्थाला कारण एकटा कर्णच आहे. म्हणून तो नाहींसा झाल्याशिवाय हें युद्ध कांहीं थांबत नाहीं. " हें ऐकून कुन्ती शोकाकुल झाली, व म्हणाली, " या युद्धांत माझ्या मुलांना जय प्राप्त होण्याविषयीं फारच आयास करावे लागतील. भीष्म, द्रोणाचार्य व कर्ण या तिघांनीं दुर्योधनाचा पक्ष स्वीकारिला आहे, हें ऐकून, जयाविषयीं मला शङ्का उत्पन्न झालेली आहे. कदाचित् भीष्म आपल्या नातवंडांवर ( म्हणजे पाण्डवांवर ) प्राणघातक बाण सोडणार नाहींत व द्रोण आपल्या शिष्यांशीं निर्घृणतेनें लढणार नाहींत.

परन्तु या कर्णाची मला फार धास्ती वाटते. हा महाबलाढ्य असून असामान्य वीर आहे. भावोजी! कर्णासम्बन्धानें एक गुप्त गोष्ट आहे ती तुम्हांला सांगत्यें. ती अशी कीं, वस्तुतः कर्ण हा राधेचा मुलगा नसून माझाच पुत्र आहे. व तो माझ्या दुष्कृत्यानें राधेला अनायासेंच मिळाला." इतकें सांगून कर्णजन्माची सम्पूर्ण हकीगत तिनें विदुरास निवेदन केली; व शेवटीं ती म्हणाली. "ही हकीगत जर कर्णाला समजली तर पाण्डव हे आपले सख्खे भाऊ आहेत, हें कळल्यावर तो त्यांच्या कल्याणाची गोष्ट अवश्य करील, म्हणजे दुर्योधनाचा तो निःसंशय त्याग करील. तुमची जर सम्मति असेल तर हें माझें नातें त्याला कळवून पाण्डवांकडे वळवितें." विदुरानें या गोष्टीला सहज सम्मति दिली, व कुन्ती तत्काल भागीरथीवर गेली; तों तिला आपला दयाळू व सत्यप्रतिज्ञ पुत्र प्रखरसूर्यतापामध्यें पूर्वाभिमुख उभा राहून मोठ्यानें वेदघोष करीत असल्याचें दिसलें. सूर्यताप कुन्तीला सहन न झाल्यानें ती कर्णाच्या जपावसानाची वाट पाहत त्याच्याच उत्तरीय वस्त्राच्या छायेंत मुकाट्यानें उभी राहिली. जप सम्पल्यावर कर्णाची दृष्टि कुन्तीकडेस गेली व त्यानें तिला वन्दन करून म्हटलें, "हे कुन्ती! मी, सूत अधिरथ व राधा यांचा पुत्र कर्ण तुला वन्दन करीत आहें. तूं मजकडेस काय हेतु धरून आली आहेस? तुला काय पाहिजे तें मजजवळून मागून घे!" कुन्ती म्हणाली, "बा कर्णा! तूं राधेय कर्ण नसून कौन्तेय कर्ण आहेस, अधिरथ हा तुझा बाप नव्हे व सूतकुलांत तूं जन्मलेलाही नव्हेस. तुझ्या जन्माचा प्रकार फारच भिन्न आहे." इतकें सांगून, कुन्तीनें कर्णाला त्याच्या जन्माची हकीगत कळविली, व म्हटलें, "कर्णा! आतां तुझ्या लक्षांत आलेंच असेल कीं, तूं सूतपुत्र

नसून कुन्तीपुत्र आहेस व पाण्डवांचा सख्खा ज्येष्ठ भ्राता आहेस. परन्तु तूं अज्ञानानें त्यांचा अपमान करून दुर्योधनाचा पक्ष स्वीकारला आहेस. तुजसारख्या धर्मज्ञाला हें शोभत नाहीं. कारण, **पुत्रानें मातेचा संतोष करणें, हाच त्याचा परमधर्म आहे,** असा धर्मशास्त्राचा सिद्धांत असल्यानें मला सन्तुष्ट करण्यासाठीं अर्जुनवधाची प्रतिज्ञा सोडून दे! व हें राज्य दुर्योधनापासून घेऊन पाण्डवांच्या हवालीं कर. बाबारे! बलरामकृष्णासारखी तुमची कर्णार्जुनांची जोडी शोभूं दे! कर्णा! माझें हें सर्व भाषण नीट लक्षांत घे व इतिउत्तर स्वतः राधेय म्हणवून न घेतां कौन्तेय म्हणवून घे." कुन्तीचें हें भाषण सम्पतांच नभोमण्डलांतून कर्णाला उद्देशून अशी वाणी निघाली कीं, "हे कर्णा! कुन्तीचें म्हणणें सर्वथा खरें आहे. व कुन्तीच तुझी माता आहे. म्हणून तिच्या आज्ञेंत तूं राहा! म्हणजे तुझें कल्याण होईल." याप्रमाणें मातेनें व प्रत्यक्ष पित्यानें सांगितलें. तरीही त्या सत्यनिष्ठ कर्णाची मति निश्चयापासून यत्किंचितही ढळली नाहीं. तो कुन्तीला म्हणाला, "तूं माझ्या कल्याणाचा म्हणून जो मार्ग मला सांगितला आहेस, तो मला मुळींच मान्य नाहीं. तूं मला जन्म दिला असशील. परन्तु मी जन्मतांच तूं माझा त्याग केल्यानें मातृत्वाचा कोणताही हक्क तुजकडेस शिल्लक राहिलेला नाहीं, व कीर्ति आणि यश हे मिळविण्याचा माझाही हक्क नष्ट झालेला आहे. मी क्षत्रियकुलांत जन्मून सूतत्व पावलों असल्यानें क्षत्रियांच्या संस्कारालाही मी कायमचा मुकलों आहें. तूं माझें जेवढें नुकसान केलें आहेस, तेवढें कोणीही करूं शकला नसता. जर उपजतांच तूं मला मारून टाकिलें असतेंस तर आज दहांत 'सूतपुत्र' म्हणून माझा अपमान तरी न होता.

माझा सर्वस्वीं घात तुला पुरवला. परंतु पाण्डवांचा यत्किंचितही तोटा तुला सहन होत नाहीं. आतां तुझ्या म्हणण्याप्रमाणें पांडवांना येऊन जर मिळालों तर हे जमलेले क्षत्रिय मला भ्याड समजतील व माझ्या तोंडावर असेंहि म्हणतील कीं, ' यानें कृष्णार्जुनांना एकत्र जुळलेले अवलोकन करून बंधुत्वाचें नातें आज शोधून काढून ऐन प्रसंगीं दुर्योधनास दगा दिला. हा मूळचाच भ्याड. ' असें म्हणून माझी हेटाळणी करितील. शिवाय धृतराष्ट्रपुत्रांबरोबर मीं आजपर्यंत नानाविध ऐषराम उपभोगिले, ते मी कसे विसरूं ? माझ्या जीवावरच कौरव, हा दुस्तर सेनासागर तरून जाण्याची इच्छा धरीत आहेत. दुर्योधनाच्या उपकाराची फेड करण्याचा सांप्रत प्रसंग प्राप्त झाला आहे; तो आम्हीं—त्याच्या आज्ञांकितांनीं—कसा गमवावा बरें ? **कारण जो सेवक धन्याचे उपकार ऐन प्रसंगीं विसरून जाऊन त्याच्या उपकाराची फेड अपकारांनीं करितो त्यास इहलोकीं अपकीर्ति व परलोकीं नरकप्राप्ति हीं ठरलेलींच आहेत.** आतां पांडवांना मिळण्याचा तुझा सल्ला ऐकून मीं हीं प्राप्त करून घ्यावीत असें तुझें म्हणणें आहे काय ? मीं जी अर्जुनवधाची प्रतिज्ञा केली आहे ती कशी बरें सोडावी ? म्हणून हे सुक्षित्रिये ! माझ्या कृतज्ञतेला, शौर्याला, वीर्याला, मित्रप्रेमाला, कीर्तीला, शीलाला व राजनिष्ठेला शोभेल अशाच रीतीनें पाण्डवपक्षाशीं मीं वागून माझ्या अगर त्यांच्या अंतकाळपर्यंत त्यांच्याशीं युद्ध करीन. आतां तूं ज्या अर्थीं माझी जन्मदात्री असून येथपर्यंत येण्याचे श्रम घेतले आहेस, त्या अर्थीं तुझा मान ठेवण्यासाठीं म्हणून मी तुला असें वचन देतों कीं, पांच पाण्डवांपैकीं मी फक्त अर्जुनाचाच वध करीन. धर्म, भीम, नकुळ आणि सहदेव हे

जरी मला वध्य आहेत व यांना जरी मी सहज जिंकून ठार मारण्यासही समर्थ आहे, तरीही मी त्यांनां मारणार नाहीं. मी आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें फक्त अर्जुनाचा युद्धांत वध करीन. अर्जुन माझ्या हातून वध पावला तर मी कृतार्थ होईन. व मी जर अर्जुनाच्या हस्तें मारिला गेलों तरीही माझी कीर्तिच होईल. आम्हां दोघांपैकीं कोणीही एक मेल्यानें तुझ्या पांच पुत्रांत कांहींच कमी होणार नाहीं." कर्णाचा हा दृढ निश्चय पाहून कुन्तीला फारच दुःख झालें; ती म्हणाली, " एकूण, तुझ्या हट्टानें सर्व कौरवांचा क्षय होणार तो कांहीं टळत नाहीं. बरें, ऐन युद्धांत अर्जुनाशिवाय चार पाण्डवांचें रक्षण करण्याची प्रतिज्ञा मात्र विसरूं नकोस." असें म्हणून तिनें कर्णाला कवटाळून आशीर्वाद दिला व कर्णानेंही आपली प्रतिज्ञा विसरणार नाहीं असें तिला आश्वासन दिलें. याप्रमाणें उभयतांचें भाषण होऊन दोघेही आपआपल्या ठिकाणीं निघून गेले.

**भीष्मकृत रथातिरथकथन.**

२ साम करण्यासाठीं धर्मराजानें तीन वेळां प्रयत्न केला, व द्रुपदपुरोहित, सञ्जय आणि भगवान् श्रीकृष्ण असे तीन दूत शिष्टाईस पाठविले. परन्तु यांचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. त्यामुळें दोनही पक्षांनीं लढाईची सिद्धता केली. कौरवांनीं भीष्मांना सैनापत्याचा अभिषेक केला व पाण्डवांनीं धृष्टद्युम्नास सेनापतित्व दिलें. या प्रमाणें उभयपक्षांकडील सिद्धता झाल्यावर एके दिवशीं दुर्योधनानें 'दोनही पक्षांकडील रथी महारथी योद्धे कोण कोण आहत ?' असा भीष्म पितामहांस प्रश्न केला. तेव्हां ते म्हणाले, ' दुर्योधना ! तूं आपल्या सर्व

बन्धूंसह रथी योद्धा आहेस; माझी माहिती तुम्हांस आहेच, तेंव्हां ती सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कृपाचार्य, कृतवर्मा, बाल्हीक आणि शाम्य हे अतिरथ होत. जयद्रथ हा द्विरथ योद्धा असून, शकुनि रथी आहे. अश्वत्थामा हा फारच पराक्रमी आहे, परन्तु यास मरणाची भीति वाटत असल्यामुळें तो महारथी व रथी यांपैकीं एकही नसून अर्धा रथी आहे. द्रोण हा **रथयूथपयूथपांचा** यूथपति आहे. याच्या एवढा पराक्रमी दुसरा वीर क्वचितच सांपडेल; परन्तु अर्जुन याचा प्रिय शिष्य असल्यानें त्यावर मात्र प्रहार करण्यास हा कचरेल ! याप्रमाणें मुख्य मुख्य योद्धयांचें वर्णन करून शेवटीं कर्णाबद्दल भीष्म म्हणतात, " तुझा मित्र, मन्त्री अगर उपदेष्टा असून जो आत्मश्लाघी व मानी वैकर्तन कर्ण हा कसा योद्धा आहे हें, राजा दुर्योधना ! ऐक. जो परमक्रोधी असून ज्याच्या सामर्थ्यावर तूं पाण्डवांशीं विरोध केलास तो कर्ण सहजकवचकुण्डलहीन असून गुरु परशुराम व एक ब्राह्मण अशा दोघांच्या शापानें दग्ध झालेला असल्यानें अतिरथ, महारथ अगर रथ यांपैकीं मी याला एकही समजत नसून हा केवळ अर्धरथ आहे, असेंच मी समजतों. हा समरांत अर्जुनाच्या हातून मृत्यु पावेल !" भीष्मांच्या या भाषणाला द्रोणांनींही आपली सम्मति दर्शविली. याप्रमाणें उभयतांचें अपमानास्पद असें भाषण ऐकतांच कर्ण सन्तापानें अगदीं लाल होऊन गेला, व म्हणाला, " **वडील माणसानें स्वतःची अब्रू स्वतःच संभाळिली पाहिजे.** हे पितामह ! तुम्ही माझा वारंवार अपमान करीत आहां, तो मी फक्त दुर्योधनासाठींच सहन करितों. तुम्ही मला मूर्ख व भितरा समजत असून आज माझी गणना

अर्धरथांत केली आहे. तुमच्या स्पष्टवक्तेपणाचा डंका सर्वत्र वाजत असल्यानें हें तुमचें बोलणें जगाला सर्वथा खरेंच भासेल. तुम्ही कौरवांचे हितशत्रु असून मजविषयीं दुर्योधन राजाच्या मनांत अप्रीति उत्पन्न करण्याचा प्रयत्न करीत असतां. तुल्यपराक्रमी राजे एकत्र जुळले असतांना अशा वेळीं ज्या अर्थीं तुम्हीं माझा पाणउतारा केलात, त्या अर्थीं आमच्या सैन्यांत कलह उत्पन्न करण्याचा तुमचा विचार स्पष्ट दिसत आहे. हे वृद्ध कौरवा! रथातिरथांची परीक्षा करण्याचें ज्ञान,केवळ वार्धक्यानें, श्रीमन्तीनें किंवा कुटुम्बाच्या मोठेपणानें प्राप्त होत नसतें. क्षत्रियांत बलाधिक्यावरून श्रेष्ठत्व ठरवितात. परन्तु तुम्ही रथातिरथांच्या पदव्या मनसोक्त वांटीत सुटलां आहांत, हें तुमचें धाडस आहे. राजा दुर्योधना! भीष्मांची ही कृति, फौजेंत फूट पाडिल्यावांचून राहणार नाहीं; व एकदां फौजेंत फूट पडली म्हणजे पुनः सैनिकांचीं मनें शुद्ध होणें फार कठीण जाईल. भीष्मांना आपल्या बळाचा गर्व झालेला आहे. यांना स्वतःशिवाय कोणी पुरुषच दिसत नाहीं! यांच्या बोलण्यावर तूं मुळींच विश्वास ठेवूं नकोस. वृद्धांचें वचन ऐकावें अशी शास्त्राज्ञा आहे; परन्तु वृद्धांचें म्हणजे भीष्मासारख्या जरठाचें नव्हे. कारण अतिवृद्ध हे पुनरपि बालच होत, असें शास्त्र आहे. वारंवार पाणउतारा केल्यानें प्रबळ पुरुषाचाही तेजोवध होतो. भीष्मा! तुम्ही फार थोर आहांत! परंतु परोत्कर्षासहिष्णुतेच्या दुर्गुणानें स्वतःची किंमत तुम्ही कमी करून घेतली आहे. जेव्हां तेव्हां असा हा माझा तेजोवध तुम्ही कां करितां? दुर्योधनासाठींच मी हें सहन करितों. एरव्हीं केव्हांच तुमचें पारिपत्य केलें असतें. राजा दुर्योधना! भर सभेंत

भीष्म मला अर्धरथी म्हणात, हें बरें नव्हे. पांडवसेनेचा पराजय करण्याला भीष्मापेक्षां मीच अधिक योग्य आहें. माझ्या समोर पांडवसेना, व्यालापुढें बैल पळतात तशीच पळत सुटेल. अर्जुनालाही मी सहज मारीन. परन्तु हें सर्व भीष्माच्या पश्चात् होईल. कारण भीष्माच्या सैनापत्याखालीं हा माझा पराक्रम भीष्मांनाच यशःप्रद होईल. म्हणून माझ्या पूर्वीच्या प्रतिज्ञेप्रमाणें मी सर्वांना पुनः निक्षून सांगतों कीं, भीष्म जीवन्त असेपर्यन्त मी हातांत शस्त्र धरणार नाहीं." कर्णाच्या या निष्ठुर भाषणावर भीष्मांनींही पुनः उत्तर दिलें, परन्तु दुर्योधनानें भीष्मकर्णांचें हें वाग्युद्ध भीष्मांचे पाय धरून मोठ्या मिनतवारीनें थांबविलें. कर्णही रागारागानें सभेंतून निघून गेला.

---

# ५

# पराक्रमपर्व.

**शरपंजरस्थ भीष्मांचें कर्णाशीं भाषण.**

१. कौरवपांडवांचें युद्ध एकंदर अठरा दिवस झालें. त्यांपैकीं प्रथम दहा दिवस भीष्मांनीं सैनापत्य स्वीकारिलें होतें. या दहा दिवसांत कर्णानें पूर्वप्रतिज्ञेनुसार शस्त्र धारण केलें नाहीं. नवव्या दिवशीं रात्रीं मात्र त्यानें दुर्योधनास सांगितलें कीं, "भीष्म कांहीं मन देऊन लढत नाहींत. म्हणून तूं त्यांच्याकडून शस्त्रसंन्यास करीव, म्हणजे मी मग तुला सहज जय मिळवून देतों." दुर्योधन काय? जयाविषयीं उल्लूच बनला होता त्यानें भीष्मास ही हकीकत सांगितली, व भीष्मांनीं दहाव्या दिवशीं भीष्म अगर पांडव यांपैकीं कोणी तरी एक राहील असें आश्वासन दिलें. दहाव्या दिवशीं कौरवपांडवांचा घनघोर रणसंग्राम झाला. त्यांत शेवटीं भीष्म शरपंजरीं पडले. भीष्म शरपंजरीं पडल्यानंतर सर्वजण त्यांस भेटून गेले. सगळ्यांच्या मागून त्यांस कर्ण भेटावयास आला, व भीष्मांला त्याच स्थितींत अवलोकन करून म्हणाला, "हे महाबाहो! कुरुश्रेष्ठा! देवव्रता! भीष्मा! जो रात्रंदिवस तुमच्या डोळ्यांत कणाप्रमाणें खुपत होता, व ज्याला आपण क्षणोक्षणीं तुच्छ मानित होतां, तो राधापुत्र कर्ण आपल्यास वंदन करीत आहे." हे शब्द ऐकून भीष्मांनीं आपले क्षीण नेत्र उघडून कर्णाकडे पाहिलें, व जवळपासच्या रखवालदारांसह सर्व लोकांस दूर जाण्यास सांगितलें. आणि कर्णावर पुत्राप्रमाणें प्रेम करून त्याला जवळ बोलावून एक हात त्याच्या गळ्यांत घातला व त्याचें तोंड

त्याहाळून ते म्हणाले, " मजबरोबर आमरण स्पर्धा करणाऱ्या शूर कर्णा ! मला भेटावयास आलास हें फार चांगलें केलेंस. जर न येतास तर मात्र तूं आपल्या कल्याणाला आंचवला असतास. बाबारे ! तूं राधापुत्र नसून कुंतीतनय आहेस. म्हणून अधिरथ सूत तुझा पिता नसून प्रत्यक्ष सूर्यच तुझा बाप आहे. हे महाबाहो ! ही गोष्ट नारद व व्यास यांनीं मला पूर्वी सांगितली असल्यानें तिच्या खरेपणाविषयीं मला यत्किंचितही शंका नाहीं. व तूं सूर्याप्रमाणें तेजस्वी आहस, हें मी प्रत्यक्ष पाहतही आहें. मी तुला जें निष्ठुर बोलत असें तें तुझ्या ठिकाणीं माझा द्वेष होता म्हणून नव्हे, तर तूं पांडवांचा विनाकारण तिरस्कार करीत असस, हें मला सहन न होऊन तुझा तेजोवध करण्याचे निमित्तानें मी तुला तसें बोलत असें. संस्कार–धर्मलोपानें (म्हणजे क्षत्रियकन्या कुंती इच्या उदरीं अव-तरून सूतजातीय राधेजवळ वाढिल्यानें क्षत्रियाप्रमाणें तुझे संस्कार न होतां सूतास योग्य असे संस्कार तुझे झाल्यानें,) दुर्यो-धनादि दुष्टजनसमागमानें व नीचाश्रयानें तुझी बुद्धि भ्रष्ट होऊन गुणिजनांचाही द्वेष करूं लागली. ही तुझी बुद्धि कौरवांच्या नाशाला किंबहुना जगत्प्रलयाला कारणीभूत होईल. तसें न व्हावें व तुझी मति सुधरावी, एवढ्यासाठींच मी तुला वारंवार टाकून बोलत असें; एरव्हीं या पृथ्वीवर तुझ्यासारखा दुसरा कोणीही धनुर्धर नाहीं, हें मी जाणून आहें. ब्राह्मणप्रतिपालकत्वामुळें कृष्णही तुला मानितो. व तुझें शौर्य अर्जुनासही घाबरवितें. मग इतरांची कथा काय ? बाबा कर्णा ! तुझी दानप्रियता अद्वितीय आहे. आजपर्यंत पुष्कळ दाते होऊन गेले, व पुढेंही होतील, परंतु तुझी बराबरी एकासही होणार नाहीं. शरयोजना, अस्त्र-

संधान, हस्तचापल्य, व अस्त्रबल यांमध्यें तूं प्रत्यक्ष शंकराप्रमाणें आहेस. काशिराजाच्या नगराला तूं एकटयानें तेथें जमलेल्या जरासंधादि सर्व राजांना पराजित करून भानुमती दुर्योधनास प्राप्त करून दिलीस, हा खरोखर अपूर्व पराक्रम आहे. दिग्विजयाचा पण करून तूं निघालास व त्याप्रमाणें दिग्विजयही करून आलास. खरोखरी तूं अफाट युद्ध करणारा असून युद्धांत तूं बळानें व तेजानें देवपुत्रासारखा पराक्रमी आहेस. मीं तुझ्यावरील राग सोडून दिला आहे व तूंही मजवरचा सोडून दे. कारण **दैवबळापुढें पुरुषबळ हें अल्प आहे, असें माझ्या प्रत्ययाला आतां पूर्णपणें आलें आहे.** माझें जर कांहीं प्रिय कर्तव्य असेल तर पांडवांचा द्वेष सोडून देऊन ( ते तुझे बंधु असल्यानें ), त्यांच्याशीं संधि कर, माझ्या मृत्यूबरोबर या कलहाचाही अंत आतां होऊंदे, व तुम्ही आतां पुढें सर्वजण मिळून प्रेमानें वागा ! नाहीं तर लक्षावधि वीरांच्या स्त्रिया या युद्धानें आपल्या पतींच्या पश्चात् हाय हाय करून प्राण सोडतील. जर तूं एकटा मनावर घेशील तर हें अवाढव्य सैन्य मृत्युमुखांतून खात्रीनें परतेल."—हें भीष्मांचें हृदय-द्रावक भाषण ऐकून कर्ण म्हणाला, " महाराज ! आपलें भाषण अक्षरशः खरें आहे. आपल्यासारख्या ज्ञान-सूर्यापुढें मीं खद्योतानें आपलें तेज काय पाडावें ? मी राधेय नसून कौन्तेय आहें, हें मलाही ठाऊक आहे. परंतु कुंतीच्या अंतःकरणामध्यें मजविषयीं मुळींच प्रेम नाहीं. कुंतीनें माझा त्याग केला, व राधेनें माझें परिपालन केलें, यामुळें राधेचा त्याग करणें मला उचित नाहीं; **दुर्योधनाचें सर्व ऐश्वर्य आजपर्यंत भोगून ऐन-समयीं मी कृतघ्न कसा होऊं ? अर्जुनाचा सखा जसा**

श्रीकृष्ण आहे, तसाच मीही दुर्योधनाचा सखा आहें. श्रीकृष्णाप्रमाणेंच मीही दुर्योधनाला साहाय्य करण्याचा दृढ संकल्प केला आहे, आणि म्हणूनच दुर्योधनासाठीं दारा, पुत्र, वित्त, शरीर, यश यांवर, किंबहुना सर्वस्वावर, मीं पाणी सोडलेलें आहे; अशा रीतीनें जर आम्हीं आनृण्य न जोडावें तर मग जगून तरी काय फायदा? बिछान्यावर खितपत पडून मरून जाणें हें वीराला सर्वथैव अनुचित होय. त्याला रणामध्येंच मरण आलें पाहिजे. असा प्रोक्त विचार करूनच मीं दुर्योधनाच्या आश्रयानें हें युद्ध चेतविलें आहे. पुरुषबलापेक्षां दैवबल अधिक असतें हें आपण जाणतच आहां. असें असतां आपणास हा माझा विचार कां नापसंत पडावा हें समजत नाहीं. सर्व क्षत्रियांतसूचक असे फार उत्पात सध्यां होत आहेत, असें आपणच सभेंत सांगितलें होतें. म्हणून माझी तुम्हांला अशी विनंती आहे कीं, तुम्ही मला रणांतच मरूं द्या. श्रीकृष्ण आणि पांडव हे सगळ्यांनाच अजिंक्य आहेत, म्हणजे यांचा पराभव करण्यास कोणीही समर्थ नाहीं, हें सुद्धां मला कळतें आहे. परंतु समरक्रीडोत्सुक चित्त कांहीं मला आवरत नाहीं. चार पांडवांना मी सहज जिंकीन. परंतु पांचव्या ( अर्जुना ) चें रक्षण प्रत्यक्ष जगदीश्वर करीत असल्यानें तो मात्र मला दुर्जय आहे. तथापि त्यासही मी लढाईंत जिंकीन असा निर्धार करून चुकलों आहें. इतक्या भीषण स्वरूपाला पोहोंचलेलें हें आमचें वैर आतां कमी होणें शक्य नाहीं, म्हणून स्वधर्माप्रमाणें धनंजया-बरोबर मी युद्धच करीन. कारण युद्धाचा माझा निश्चय अढळ आहे. हें जाणून मला युद्धार्थ आपण अनुज्ञा द्यावी.

महाराज ! आजपर्यंत मी आपणांस फारच मर्मभेदक व कटु असें बोललों आहें. त्यावेळीं आपण मजवर दया करून मला क्षमा केली नसती, तर हा नीच देह आजला अस्तित्वांतही राहिला नसता. आपण कृपा करून माझ्या सर्व अपराधांची थोर मनानें मला क्षमा करा. व ज्या कार्याला आपण अनुसरलों आहोंत, त्याला अनुमोदन द्या ! म्हणजे माझा उत्साह वाढेल. माझें कटु भाषण तुमच्या अंतःकरणांत राहिलें नाहींच, पण मी तें न राहण्याबद्दल आपली आणखी प्रार्थना करतों." एवढें बोलून कर्ण गप्प बसला व ढळढळा रडूं लागला. कर्णाचें भाषण ऐकून भीष्म म्हणाले, " कर्णा ! येथवर पेटलेलें हें दारुण वैर आतां सोडतां येणें शक्य नाहीं, असाच जर तुझा आग्रह असेल तर मीही तुला युद्धार्थ अनुज्ञा देतों. कर्णा, ही तुझी सद्बुद्धि तुला उत्तम फळ प्राप्त करून देईल. तूं स्वर्गप्राप्तीच्या इच्छेनें युद्ध कर. क्रोध, अहंकार, व खुनशीपणा यांचा त्याग कर. व सत्त्व न सोडितां राजकार्यार्थ रणांत पराक्रम कर. म्हणजे तुला शेवटीं उत्तम गति प्राप्त होईल. कारण, धर्मार्थ युद्ध करणें याहून क्षत्रियाला अधिक कल्याणप्रद अशी दुसरी कोणतीही गोष्ट नाहीं. कौरवपांडवांमध्यें सख्य व्हावें म्हणून मीं फार प्रयत्न केला, परंतु यश आलें नाहीं. असो. आतां आपण सर्वांनीं मिळून जें कार्य करण्यास प्रारंभ केला, त्याला माझें अनुमोदन कसें असणार नाहीं ? कर्णा ! आतां एक वेळ मला कडकडून भेट व मग तूं जा." कर्णानें याप्रमाणें भेटून भीष्म प्रभूस वंदन केलें व तो निघून गेला.

२. भीष्म रणांत पडल्यावर कर्णाच्या संमतीनें दुर्योधनानें द्रोणाचार्यांस सेनापतित्वाचा अभिषेक केला. द्रोणाचार्यांनीं एकंदर पांच दिवस युद्ध केलें. या पांच दिवसांत कर्णही युद्धांत सामील झाला होता. या मुदतींत कर्णानें दोन चार वेळां प्रशंसनीय व अतुल पराक्रम केला. अभिमन्यूशीं लढतांना द्रोणादि अतिरथीही जेव्हां विमुख आले, तेव्हां कर्णानेंच पुढें सरसावून अभिमन्यूचें धनुष्य तोडून टाकिलें. अभिमन्यूला मारण्यांत कर्णही (द्रोण, अश्वत्थामा, बृहद्बळ, कृतवर्मा, व कृप या) पांच जणांना सामील झालेला होता. भीमानें द्रोणपर्वांत कर्णाचा तीन चार वेळां पराजय केल्याचें नमूद आहे. व कर्णानें एकदां भीमास जिंकिलें असेंही वर्णन द्रोणपर्वांत आहे. कर्णानें भीमाचा पराजय करून त्याला कोदंडानें डिंवचलें व म्हटलें, "अरे षंढा! युद्ध हें शूराचें काम आहे. मूर्खा! स्वयंपाकघर सोडून येथें कशाला आलास? खादाडा! बहुविध भक्ष्य, भोज्य व पेय पदार्थ असतील तेथेंच तूं योग्य आहेस. भित्र्या! अस्त्रांचें कांहींच ज्ञान संपादन न करतां रणभूमीवर युद्धार्थ सिद्ध झालास त्या तुज आचाऱ्याला, आचारी आणि योद्धे हे सारख्याच योग्यतेचे वाटतात काय? घरांतील आचारी व पाणके यांच्या अंगावर ओरडून भोजनासाठीं रागानें तूं त्यांसच मारावेंस. तूं युद्धकलेंत निपुण नाहींस. युद्धविशारदही नाहींस. म्हणून तूं शस्त्र चालविण्यासही योग्य नाहींस. वास्तविक पाहतां तुझें काम आचाऱ्यावर देखरेख ठेवण्याचें आहे. तें टाकून येथें कशाला आलास? येथें काय जेवणाची पंगत बसली होती? किंवा वाढप्यावर देखरेख

कर्णकृत भीमोपहास.

ठेविण्याची होती काय ? बरें; आलास तर आलास; पण मजसारख्याशीं युद्धप्रसंग तरी कशाला केलास ? आपल्या बरोबरीचा योद्धा पाहून त्याशींच तूं यापुढें युद्ध करीत जा. आतां येथून जा, व अर्जुनाच्या मागें जाऊन लपून बैस, किंवा, हे कुंतीपुत्रा ! युद्धाचें कठीण काम सोडून देऊन घरीं जाऊन स्वस्थ बैस. अथवा फलमूलांवर उपजीविका करून कायमचा वनवासी हो." या भाषणानंतर भीम तेथून निघून गेला. भीमानें ज्याप्रमाणें तीनचार वेळां कर्णाचा पराभव केला होता, त्याचप्रमाणें सात्यकीनेंही एकदां कर्णाचा पराभव केल्याचें द्रोणपर्वांत लिहिलेलें आहे.

**कर्णकृत दुर्योधन-सांत्वन.**

३. अभिमन्युवधामुळें अर्जुनास फार संताप येऊन त्यानें जयद्रथवधाची प्रतिज्ञा केली व ती दुसरे दिवशीं त्यानें पूर्णही केली. हें पाहून दुर्योधन फार खिन्न झाला व कर्णास म्हणाला, " कर्णा ! द्रोणाचार्यांनीं जयद्रथास अभय देऊन दुर्भेद्य व्यूहरचना केली, परन्तु अर्जुनानें श्रीकृष्णाच्या साहाय्यानें हजारों मूर्धाभिषिक्त राजांचा नाश करून तुम्हां सर्व योद्धयांच्या समक्ष जयद्रथाला ठार मारिलें. इंद्रासही दुर्भेद्य असा व्यूह अर्जुनानें कसा फोडिला ? हें मला समजत नाहीं. अर्जुन हा द्रोणाचार्यांचा प्रिय शिष्य असल्यानें, मला वाटतें, आचार्यांनीं त्याला व्यूहांत प्रवेश करण्यास मार्ग दिला. जीविताच्या आशेनें जयद्रथ राजा आपल्या नगरास निघून जात असतां त्याला द्रोणाचार्यांनीं अभय देऊन ठेवून घेतलें. याप्रमाणें सिंधुराजाच्या रक्षणाची एकीकडून तजवीज करून, दुसरीकडून, त्याच रक्षणस्थानांत द्रोणाचार्यांनीं

अर्जुनास प्रवेश करूं दिला. या अशा निष्काळजीपणानें जयद्रथाच्या नाशास द्रोणाचार्यच कारणीभूत झाले, असें मी समजतों." दुर्योधनाचें याप्रमाणें कठोर भाषण श्रवण करून कर्णानें उत्तर दिलें, "राजा! गुरूला तूं निष्कारण दोष देत आहेस. ते यथाशक्ति (ते आपली शिकस्त करून) शत्रूशीं युद्ध करीत आहेत. अर्जुन तरुण आहे, शूर आहे, अस्त्रसंपन्न आहे, व चपलही आहे; भगवान् श्रीकृष्ण हा त्याचा सारथी आहे. त्याचे भातेही अक्षय्य आहेत, त्याचा वानरध्वजांकित रथ दिव्य आहे, त्याचें गांडीव धनुष्य कधींही जीर्ण न होणारें असें आहे, व त्याचें कवच अभेद्य आहे; या मानानें पाहिलें म्हणजे द्रोणाचार्य फारच क्षीण दिसतात. सांप्रत ते वृद्ध झालेले आहेत; तरुणपणची शक्ति, उत्साह, चापल्य व स्मृति यांची या वयांत आपण गुरूंच्या ठिकाणीं अपेक्षा करणें, हा आपला मूर्खपणा आहे. राजा! आचार्य हे वृद्ध असल्यानें त्वरित गमन करण्यास व भराभर शस्त्रास्त्रें सोडण्यास असमर्थ आहेत. द्रोण जरी अस्त्रज्ञ आहेत तरी अर्जुन त्यांस अजिंक्यच आहे आणि म्हणूनच त्यानें त्यांची अतिक्रमणा करून व्यूहांत प्रवेश केला. **जयापजय हे पराक्रमापेक्षां दैवावर अधिक अवलंबून असतात.** या युद्धांत कोणीही अंग चोरून लढत नाहीं. यथाशक्ति आम्ही सर्वजण समरांत तुला जय प्राप्त करून देण्यासाठीं प्रयत्न करीत असूनही जर तुला तो प्राप्त होत नाहीं, तर आम्हीं त्याला काय करावें? **आपण समरांगणांत पराकाष्ठेचा प्रयत्न करीत असूनही आपल्या पौरुषाचा विघात करून दैव आपणांस मागें सारीत आहे. तथापि, उद्योगी पुरुषानें आपलें कर्तव्य निःशंकपणें सदोदित**

करीत असावें. कोणत्याही कामांत सिद्धि प्राप्त होणें अगर न होणें, ही गोष्ट दैवाधीन आहे. दुर्योधना ! पांडवांस आपण कपटानें नागविलें, त्यांस विष दिलें, लाक्षागृहांत जाळिलें, द्यूतांत जिंकिलें, व अरण्यांतही पाठविलें. परंतु आपले हे सर्व प्रयत्न दैवानें हाणून पाडिले, तरी पण राजा ! तूं दैवावर विसंबून न बसतां प्रयत्नाचाच अवलंबन करून युद्ध कर. तुम्हां दोघांच्या प्रयत्नांत ज्याचा प्रयत्न अधिक होईल, त्यास जयश्री माळ घालील. तुझा पराभव व्हावा असें कांहीं भयंकर पातक तूं केलें आहेस, किंवा पांडवांचा जय व्हावा म्हणून पांडवांनीं कांहीं विशेष पुण्यकर्म केलें आहे, असें मला मुळींच वाटत नाहीं. सुकृत किंवा दुष्कृत हें सर्व दैवच ठरवितें. परंतु आजपर्यंतच्या युद्धावरून आपणांस दैव अनुकूल नाहीं, असें उघड दिसतें; तथापि धीर सोडण्याचें मुळींच कारण नाहीं. राजा ! आम्ही सर्वजण आपली शिकस्त करून तुला जय प्राप्त करून देऊं."

**कर्ण व कृप यांचें वाग्युद्ध.**

४. जयद्रथाचा वध द्रोणाचार्य सेनापति झाल्यापासून चवथ्या दिवशीं सायंकाळीं झाला. त्या दिवशीं रात्रींही युद्ध झालें; म्हणजे ही गोष्ट एकंदर युद्धारंभापासून चौदाव्या दिवशीं झाली. जयद्रथ-वधामुळें कौरवपक्ष खिन्न झाला होता व पांडवपक्षाचीं मुखकमलें विजयोत्साहानें प्रफुल्ल पुष्कराप्रमाणें दिसत होतीं. अशा स्थितींत जें युद्ध होणार, तें कौरवांना हानिप्रद असेंच होणार. कौरवपक्षाकडील मोठमोठे वीरही युद्धांत कच खाऊं लागले. हें पाहून दुर्योधन फारच घाबरला व कर्णाजवळ येऊन म्हणाला, " मित्रवत्सला कर्णा !

मित्राच्या खऱ्या परीक्षेची हीच वेळ आलेली आहे. हा समय मला फारच भयंकर व दुर्लभयशःप्रद असा वाटत आहे. पांचाल, मत्स्य, केकय व पांडवांकडील सर्व महारथी अतिशय कोपले असून त्यांनीं आमचें सारें सैन्य अगदीं वेढून टाकिलें आहे. यासाठीं अशा वेळीं तूं कांहीं मनावर घेशील तरच, आपण या संकटांतून पार पडूं." दुर्योधनाचें हे निराशासूचक व उद्वेगजनक उद्गार ऐकून कर्ण म्हणाला, "राजा! तूं इतका कां घाबरतोस? अर्जुनाचें रक्षण करण्यास आज येथें प्रत्यक्ष इंद्र जरी प्राप्त झाला, तरी मी त्याचाही पराभव करून अर्जुनास ठार मारीन, हें तूं खात्रीनें लक्षांत ठेव. तुझें प्रिय करण्यासाठींच माझें जीवित आहे. 'सर्व पंडुपुत्रांमध्यें अर्जुन अधिक बलवान् आहे, म्हणून वासवीशक्तीनें मी त्याचा वध करून तुला जय प्राप्त करून देईन. महाधनुर्धर अर्जुन मरण पावल्यावर त्याचे चौघे बंधु एक तर तुझ्या अंकित होतील, किंवा निरंतर वनवास तरी करतील. कौरवा! हा कर्ण जिवंत असतां जयाविषयीं तूं इतका भीतमानस कां झालेला आहेस?" हें कर्णाचें समयोचित व स्फूर्तिदायक भाषण ऐकून कृपाचार्य म्हणतात, "कर्णा! धन्य आहे तुझी! तुजसारखा पाठीराखा मिळाल्यानेंच हा दुर्योधन राजा सनाथ झालेला आहे. तुझा शब्दच तेवढा तेजस्वी आहे. परन्तु तुझ्या अंगाचा पराक्रम मात्र श्रुत नाहीं. आजपर्यंत जेव्हां जेव्हां पांडवांबरोबर तुझा संग्राम झाला, तेव्हां तेव्हां, पांडवांनींच तुला जिंकिलेलें आहे. गंधर्वांनीं जेव्हां दुर्योधनास धरिलें होतें, तेव्हां तूं आधींच पळाला होतास. वास्तविक ही गोष्ट तुला मरणप्राय वाटावयास पाहिजे. उत्तरगोग्रहणसमयीं तुझीं वस्त्रें हिसकून नेलीं, हें तूं कसें विसरलास? एकटया अर्जुनापुढें रणांगणांत तुझा टिकाव लागत नाहीं,

तो तूं, कृष्णासह सर्व पांडवांस जिंकण्याचा उत्साह धरितोस त्या अर्थी तुला काय म्हणावें? हे सूतपुत्रा! तूं शारदीय मेघाप्रमाणें निष्फल गर्जना मात्र करीत असतोस. परन्तु हें या दुर्योधनाला कळत नाहीं. क्षत्रिय हा भुजबलानें, ब्राह्मण हा शब्दबलानें, अर्जुन हा धनुष्यबलानें व कर्ण मात्र मनोरथांनीं शोभत असतो. कर्णा! काडीमात्रही प्रताप तुझ्यांत नाहींत. अरे, ज्यानें प्रत्यक्ष चंद्रशेखरासही युध्दानें संतुष्ट केलें, त्या अर्जुनापेक्षां अधिक पराक्रमी असा कोण आहे? त्याची आणि तुझी समरांगणांत गांठ पडली नाहीं, तोंपर्यंतच तुला कांहीं गर्जना करावयाची असेल ती करून घे." याप्रमाणें कृपाचार्यांनीं कर्णास कोपविलें. तेव्हां तो वीरश्रेष्ठ कर्ण कृपाचार्यांस म्हणाला, "गर्जना करणें हा मेघाप्रमाणें शूरांचाही धर्म आहे. रणामध्यें शूर पुरुष प्रौढी मिरवितात. त्यांत त्यांचा कांहींही दोष नसतो. **जेव्हां एखादें कृत्य करण्याविषयीं मनुष्य दृढ निश्चय करितो, तेव्हां दैवही त्याला अनुकूल होतें. दैवापेक्षां उद्योगावरच माझा अधिक विश्वास आहे, व म्हणून मी प्रयत्नेंकरून कृष्णार्जुनांना जिंकण्याचा हुरूप धरीत आहे.**पाण्डुपुत्रांचा वध करूनच मी गर्जना करीत आहें, असें मी समजतों. यांत तुमचें काय नुकसान झालें आहे? हें मला कळत नाहीं. **शूरांच्या गर्जनेचें रहस्य शूरच समजतात. इतरांस तें कळणें अशक्य आहे. पंडितांचे परिश्रम पंडितांसच कळतात. मूर्खाला त्याची काय कल्पना?** कृष्णार्जुनांना मी रणामध्यें निश्चित मारून ही सर्व पृथ्वी निष्कंटक करून ती दुर्योधनाला अर्पण करीन असा उत्साह माझे मनांत आहे. व तो सफल केलेला तुम्हीच अवलोकन कराल." हें ऐकून कृपाचार्य म्हणाले,

" तुझे हे मनोरथ व तुझ्या वल्गना, कर्णा! मला ग्राह्य वाटत नाहींत. सत्यवादी धर्मपुत्र युधिष्ठिर, इन्द्रासारखा पराक्रमी अर्जुन, व भगवान् श्रीकृष्ण या व्यक्ति ज्याला प्राकृत वाटतात, तो मनुष्य कसला? जिकडे योगेश्वर कृष्ण व धनुर्धर पार्थ ही जोडी आहे तिकडेसच जय ठेवलेला आहे. कर्णा! अतुल सामर्थ्यवान् श्रीकृष्ण ज्यांचा पाठिराखा आहे, त्या पाडवांना तूं रणांत जिंकणार कसा? आज चौदा दिवसांत आपल्या कडील लक्षावधि अतिरथी, महारथी मरून गेल्यानें, आमच्या अगणित सैन्याचा विलक्षण क्षय झालेला आहे; पांडव व त्यांचे साहाय्यकर्ते, हे ब्राह्मणांविषयीं कृपाळू, सत्यवादी, मनोनिग्रही, सर्वास्त्रवेत्ते, गुरुभक्त, धर्मनिष्ठ व मोठे शहाणे असे आहेत. म्हणून ते, देव, गंधर्व, यक्ष, मनुष्य, उरग व राक्षस या सर्वांना एकसमयावच्छेदेंकरूनही अजिंक्य आहेत. हे सूतपुत्रा कर्णा! अशा पांडवांना जिंकण्याचा जो तूं उत्साह धरितोस, तीच तुझी सर्वांत मोठी व प्रथमपासूनची चुकी झालेली आहे."

कृपाचार्यांचें हें मर्मभेदक भाषण ऐकून कर्ण फारच संतापला व शारद्वत कृपाचार्यांस म्हणाला, " ब्रह्मन्, तूं वर्णन केलेंस त्यापेक्षांही अधिक सद्गुण पाण्डवांमध्यें आहेत. इंद्रासह सर्व लोकपालांना पांडव अजिंक्य असतील. परंतु मला मात्र ते अजिंक्य नाहींत. इंद्रदत्त वासवी शक्तीनें मी अर्जुनाचा निःसंशय वध करीन. व अर्जुनमरणानंतर बाकीचे चार पाण्डव खात्रीनें प्राणत्याग करतील. गौतमा! याप्रमाणें सर्व पाण्डव नष्ट झाले म्हणजे, ही समुद्रवलयांकित पृथ्वी अनायासेंच कौरवेश्वराच्या ताब्यांत येईल. या सर्व गोष्टी मुत्सद्देगिरीनें व शौर्यानें साधणार आहेत, हें जाणू-

नच मी गर्जना करीत आहें. कुरूंचा उत्कर्ष तुला सहन होत नाहीं, हें तुझ्या शब्दांवरूनच कळतें. आणि पाण्डवांचा तूं स्नेही असल्यानें पदोपदीं माझा अपमान करीत आहेस. दुष्टा ! आम्हांला भिवविण्यासाठीं पाण्डवांची स्तुति करीत आहेस काय ? द्रोणाचार्यासारखे अद्वितीय योध्दे आमच्या पक्षाकडेस असतांना आम्हीं सुद्धां इंद्रादि लोकपालांस अजिंक्य आहोंत. ह्याची जाणीव तूं वृद्ध झाल्यामुळें तुला नाहीं, याला इतरानें काय करावें ? आतां जयापजय प्राप्त होणें ही गोष्ट सर्वस्वीं प्राक्तनावर अवलंबून आहे हें मला माहीत आहे. कारण भीष्म, जयद्रथ, भूरिश्रवा, भगदत्त हे वीर देवांनाही अजिंक्य होते, व पाण्डवांपेक्षां अनेक पटींनीं अधिक बलाढ्य होते. तथापि युद्धामध्यें ते पतन पावले.तेव्हां, हे नराधमा ! हा सर्व दैव-दुर्विलासाचा खेळ आहे, हें निःसंशय होय. शिवाय, हे विप्रा ! तूं ज्या पाण्डवांची स्तुति करीत आहेस त्या पाण्डवांचेही लक्षावधि वीर या चौदा दिवसांत गतप्राण होऊन पडलेले तुला दिसत नाहींत, त्या तुझ्या आंधळेपणाला आम्हीं काय करावें ? हे द्विजाधमा ! दुर्योधनाच्या कार्यासाठीं मी पाण्डवांशीं यथाशक्ति युध्द करीन. परन्तु तूं जर पुन्हां असें अप्रिय भाषण करशील तर , तूं हितशत्रूच समजून तुझी जीभ कापून टाकीन हें लक्षांत ठेव." हें कर्णाचें उद्धत भाषण ऐकतांच कृपाचार्यांचा भाचा अश्वत्थामा तरवार उपसून कर्णावर धावला व म्हणाला, " हे सूतपुत्रा कर्णा ! अर्जुनाच्या खऱ्या गुणांची प्रशंसा तुला द्वेषभावामुळें सहन होत नाहीं; तूं निव्वळ गर्वामुळें सर्वलोकधनुर्धराची पर्वा करीत नाहींस. सर्वशस्त्रधराग्रणी व कधींही पराभव न पाव-

लेल्या लौकैकवीर अर्जुनाला तूं कोणत्या अस्त्रानें जिंकशील, हेंच कळत नाहीं. हे सूताधमा ! निव्वळ मनोरथांच्या जोरावर तूं त्याला जिंकण्याची इच्छा करीत आहेस. अर्जुनाच्या शतांशही युद्धशिक्षा तुला ठाऊक नसून, तूं काय गडबड चालविली आहेस ? हे निर्लज्जा ! हितकर्त्याची जीभ कापण्यास जो तूं निघालास त्या तुझीच मान मी अगोदर कापून टाकितों. " असें म्हणून तो खरोखरींच पुढें सरसावला. हें पाहून सर्व मंडळी घाबरून गेली. व दुर्योधन आणि कृपाचार्य यांनीं मोठ्या शिकस्तीनें त्याला आंवरून धरिलें. तेव्हां कर्ण म्हणाला, " सोडा त्याला ! त्याची मस्ती आतांच जिरवून टाकितों. हा दुर्मति द्विजाधम किती शूर आहे, हें मला ठाऊक आहे. याला सोडा ! म्हणजे माझा पराक्रम काय आहे हें तरी सर्वांना कळेल. " हा तंटा पुढें विकोपास गेला असता, परंतु दुर्योधनानें मोठ्या खुबीनें मध्यस्ती करून तो मिटविला. पुढें या सर्वांनीं कर्णालाच पुढें करून पाण्डवसैन्यावर चाल केली. तेव्हां कर्णानें असा पराक्रम केला कीं, एकही योद्धा त्याच्या पुढें उभा राहीना. हें पाहून अर्जुन पुढें सरसावला. त्यालाही या बहाद्दरानें मूर्च्छित करून परत फिरविलें. नंतर कांहीं वेळानें सहदेव कर्णाशीं युद्ध करण्यास आला. त्याला पहिल्याच तडाख्यांत विरथ केला व त्याची ढालतरवारही मोडून टाकिली. नंतर त्याला पकडून कर्ण म्हणाला, " अरे भित्र्या सहदेवा ! बरोबरीचा योद्धा पाहून युद्ध करीत जा ! निवडक योध्यांबरोबर रणांत लढत जाऊं नकोस. तूं कुंतीचा केवळ प्राणच आहेस. म्हणून तिच्या व भावांच्या लाडानें तूं फारच उद्धत झालेला आहेस. पण हें बरें नव्हे. माझ्या बोल-

ण्याबद्दल तूं कांहीं संशय धरूं नकोस. कारण तेंच तुझ्या हिताचें आहे. म्हणून हे माद्रीपुत्रा ! तू आतां मजपुढें उभा न राहतां अर्जुनाकडे जा, किंवा घरीं कुन्तीकडे जा." इतकें बोलून त्यानें सहदेवास सोडून दिलें.

५. अर्जुन आणि सात्यकि यांनीं, कौरवसैन्याला जेव्हां बरेंच त्रासविलें, तेव्हां दुर्योधन कर्णाला थोडासा लावून बोलला. तें ऐकून कर्ण रागावला व द्रोणाचार्यांसह पुढें सरसावून पाण्डवसैन्याचा नाश करूं लागला. धर्मराजास तर कर्णाचा पराक्रम पाहून धडकीच भरली. व तो अर्जुनास म्हणाला, "हा महाधनुर्धर कर्ण, या रात्रीच्या दारुण प्रसंगीं धनुष्य हातांत घेऊन रणभूमीवर सूर्यासारखा तळपत आहे. अर्जुना ! कर्णाच्या बाणांनीं घायाळ होऊन आपले वीर सैन्यासुद्धां मागें पळत सुटले आहेत. कर्ण हा धनुष्यावर बाण ठेवितो केव्हां ? व सोडतो केव्हां ? हें मुळींच समजत नाहीं. मला वाटतें, आज तो आपणांस ठार केल्याशिवाय राहत नाहीं. धनंजया, तूं कर्णाचा कसेंही करून लवकर वध होईल अशी तजवीज कर." हें ऐकून अर्जुन श्रीकृष्णास म्हणाला, "आज कर्णाच्या पराक्रमानें राजा युधिष्ठिर भिऊन गेलेला आहे. कर्णाचें सैन्य आमच्या सैन्यावर वारंवार हल्ले करून त्याला भंडावून सोडीत आहे. इकडे पळत असलेल्या आमच्या महारथ्यांना कर्ण तीक्ष्ण बाणांनीं निर्भयपणें वेध करीत आहे. हें मला पाहवत नाहीं. म्हणून हे मधुसूदना ! जिकडेस कर्ण आहे तिकडेस तूं आपला रथ घेऊन चल ! आणि कसेंही करून कर्णाची व माझी गांठ घालून दे. म्हणजे एक कर्ण तरी

**घटोत्कचवध.**

आज मला मारील, किंवा मी तरी त्याचा प्रांण घेईन." हें ऐकून श्रीकृष्ण म्हणाले, "अर्जुना! अमानुष पराक्रमी नरव्याघ्र कर्ण, देवराज इन्द्रासारखा या समरभूमींत संचरत आहे. धनंजया! त्या सूतपुत्राशीं तुझा सामना होण्याची वेळ अद्याप आली नाहीं. कारण जोंपर्यंत मोठ्या उल्केसारखी दैदीप्यमान वासवी शक्ति त्याच्या जवळ तयार आहे, व तो ती तुजवर सोडण्यास उपयोगी पडावी म्हणून जोंपर्यंत जपून ठेवीत आहे, तोंपर्यंत तूं त्याचे समोर जाऊन युद्ध करण्याची गोष्ट काढूं नकोस. कर्णाजवळ ती अमोघ पराक्रमी शक्ति असेपर्यंत कर्ण तुला व मला ही फारच भीतिप्रद आहे. वारंवार तूं मला कर्णाजवळ रथ नेण्यास सांगत असूनही, मी तुझें म्हणणें ऐकत नाहीं, याचें मुख्य कारण ती एक शक्तीच होय. कर्णाचा पराभव करण्यास एक तूं किंवा एक घटो-त्कच याशिवाय तिसरा कोणी समर्थ नाहीं. महाबलिष्ठ घटोत्कच देवासारखा पराक्रमी असून, त्याला दिव्य, आसुर व राक्षस या तीनही प्रकारचीं अस्त्रें अवगत आहेत आणि तो आपणांवर अनुरक्त असून आपलें प्रिय करण्यास सतत तत्पर असतो. म्हणून युद्धामध्यें तो कर्णाला सहज जिंकील, असें मला वाटतें. याप्रमाणें कृष्णानें अर्जुनास सांगून घटोत्कचास हाक मारिली. तोंच तो राक्षस कवच, धनुष्यबाण, व खड्ग यांसह एकदम तेथें प्राप्त झाला. व कृष्णार्जुनांस वंदन करून म्हणाला, "या दासाला काय आज्ञा आहे?" यावर भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, "बाळा घटोत्कचा! सांप्रत तुझ्या पराक्रमाची वेळ प्राप्त झाली आहे. कारण या कर्णानें पांडवसेनेची दुर्दशा करून सोडली आहे. हा कर्ण मोठा धनुर्धर, बुद्धिमान् व दृढपराक्रमी असा आहे. याच्याशीं पांडवसैन्यांतील कोणीही

वीर युद्ध करण्यास समर्थ नाहीं. याचा रणमद जिरविणारा तुजवांचून मला दुसरा कोणीही वीर येथें दिसत नाहीं. यास्तव तूं या रात्रीच्या वेळीं महाधनुर्धर कर्णाला ठार कर." कृष्णाच्या या प्रोत्साहनकारक सूचनेस अर्जुनानेंही संमति दर्शविली. तेव्हां घटोत्कचानें सांगितलें, "मी आज कर्णाला या जगांतून नाहींसा करितों. आजच्या लढाईत शूर, भित्रा, अगर नम्र यांपैकीं मी कोणाचीही गय करणार नाहीं. राक्षसधर्माप्रमाणें मी सूतपुत्राशीं भयंकर युद्ध करून त्यासह सर्व सैन्याला यमसदनीं पाठवून देतों. कृष्णार्जुनहो! तुम्ही स्वस्थ असा." इतकें सांगून तो महाबलाढ्य हिडिंबापुत्र रागारागानें मोठमोठ्या उड्या टाकीत व शत्रुसैन्यास भयभीत करीत कर्णावर चालून गेला. हें पाहून दुर्योधनानें जटासुरपुत्र अलंबुष ( राक्षस ) यास घटोत्कचावर पाठवून दिलें. या उभयतां राक्षसांचें तुमुलयुद्ध झाल्यावर घटोत्कचानें अलंबुषाचा शिरच्छेद करून दुर्योधन राजास तें शिर नजराणा म्हणून अर्पण केलें. गोविन्दपन्त बुन्देल्यांचें शिर अहम्मदशहानें भाऊसाहेबांस पाठविलें होतें ती या गोष्टीचीच पुनरावृत्ति म्हणण्यास हरकत नाहीं. असो. यावेळीं घटोत्कच फारच भीषण दिसत होता. त्याचे नेत्र आरक्त होते, शरीर फारच मोठें म्हणजे पर्वतप्राय होतें, केश ताठ असून दाढी हिरव्या रंगानें रंगवेलेली होती. त्याचें तोंड आकर्ण विदारिलेलें असून दाढा तीक्ष्ण होत्या. सर्व शरीर मेघवर्ण असून जिव्हा मात्र लाल रंगाची होती. तो फारच विद्रूप दिसत होता. त्यानें आपल्या अंगावर अनेक अलंकार घातले होते. त्याच्या अंगांत कांशाचें कवच होतें. त्याचा रथ चारशें हात लांबरुंद असून त्यांत हजारों घुंगरू वाजत होते.

त्या रथावर आस्वलांच्या कातडयांचें आच्छादन होतें. त्या रथांत उत्तमोत्तम आयुधांचा सांठा होता. त्याला आठ चाकें असून तो चालूं लागला म्हणजे मेघगर्जनेप्रमाणें गंभीर ध्वनि होत असे. त्या रथाला मत्तमातंगासारखे रक्ताक्ष, भयंकर व अत्यंत वेगवान् असे शंभर बळकट घोडे जोडिले असून हे घोडे वारंवार खिंकाळत होते. घटोत्कचाचा ध्वज अति प्रचंड असून आकाशाला जाऊन भिडलेला होता. त्या ध्वजावर गृध्र पक्ष्याची स्थापना केली होती. घटोत्कचाचें धनुष्यही असेंच प्रचंड होतें. अशा तयारीनिशीं घटोत्कचानें कौरवसेनेवर व विशेषतः कर्णावर चाल करून शस्त्रास्त्रांचा मारा सुरू केला. त्यानें राक्षसी मायाही तेथें उत्पन्न केली. त्यामुळें कौरवसैन्यावर पाषाणवृष्टि होऊं लागली. व लोखंडी चक्रें, भृशुंडी, शक्ति, तोमर, शूल, शतघ्नी, पट्टे, यांचा कौरवसैन्यावर चोहोंकडून एकसारखा वर्षाव होऊं लागला. त्यायोगें व घटोत्कचाच्या सिंहनादानें एकूनएक सैनिक गर्भगळीत होऊन गेला. इतरांची कथा काय ? प्रत्यक्ष भीमसेनही तो सिंहनाद ऐकून मनांत दचकला. मात्र अस्त्रबलाचा गर्व वाहणारा मानी कर्ण काय तो एकटाच भ्याला नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यानें घटोत्कचाची माया बाणांनीं पार उडवून दिली व घटोत्कचाचें शरीर बाणांनीं घायाळ केलें. याप्रमाणें उभयतांचें युद्ध बऱ्याच रंगांत आलें व घटोत्कचानें कर्णापुढें आपलें कांहीं चालत नाहीं असें पाहून संतप्त होऊन शंकरानें निर्माण केलेली एक आठ चक्रांची महाघोर अशनी कर्णावर फेंकली. त्या अशनीवर सारखे शूल लाविले असून ती लोहमय होती. ती अशनी अत्यंत वेगानें आपल्यावर येत आहे असें पाहून कर्णानें रथाखालीं उडी

मारून एकदम तिला धरिलें व तितक्यातच वेगानें परत ती घटोत्कचावर फेंकली. हें पाहून घटोत्कचानें रथांतून खालीं उडी मारिली. त्या महातेजस्वी अशनीनें, घटोत्कचाचे अश्व, ध्वज, व सारथी यांसुद्धां त्या प्रचंड रथाचें भस्म करून भूमीमध्यें प्रवेश केला. इतक्यांत दुर्योधनानें हलायुध राक्षसाला भीमसेनावर पाठविलें. त्या राक्षसानें भीमसेनास जर्जर केलें. तेव्हां कृष्णानें घटोत्कचास कर्णाचा नाद सोडून देण्यास सांगून, हलायुधाशीं युद्ध करण्यांस सांगितलें. घटोत्कचानें हलायुधाचाही थोडक्याच वेळांत प्राण घेतला. इकडे कर्णानेंही पांडवसैन्याची दाणादाण उडवून दिली. हें पाहून घटोत्कच एकदम गुप्त झाला व त्यानें राक्षसी माया प्रगट केली. व कर्णावर चोहोंकडून मारा सुरू केला. कर्णानेंही अत्यंत चापल्यानें स्वतःचें रक्षण केलें. परंतु इतर सैनिकांना तो मारा सहन होईना. घटोत्कचानें आपल्या मायेच्या योगें हजारों राक्षस उत्पन्न करून कौरवसैन्याची दुर्दशा केली. घटोत्कच कोणालाही जीवंत सोडीना. कर्णाशिवाय मी मी म्हणणाऱ्या सर्व योद्ध्यांचा मद अगदीं जिरून गेला. सर्व कौरववीर जिवाच्या आशेनें सारखे पळत सुटले. रणांगणावर त्या राक्षसी मायेशीं निर्धास्तपणें झगडणारा कर्णच कायतो एकटा उभा होता. कर्णाचीं सर्व दिव्य अस्त्रें त्या राक्षसी मायेनें विफल करून टाकिलीं. तथापि तो मुळींच भांबावला नाहीं. इतर सर्व वीरांना मात्र आपण आतां कांहीं प्रातःकालचा सूर्य पाहत नाहीं असेंच वाटलें. हा प्रकार अवलोकन करून दुर्योधन कर्णाला म्हणाला, "कर्णा! या घटोत्कचाशीं युद्ध करून प्रत्यक्ष ब्रह्मदेवासही जय प्राप्त होईलसें वाटत नाहीं. याची शस्त्रास्त्र-

प्रवीणता व याचा मायावीपणा पाहून आम्हां सर्वांस हा कल्पांतच भासत आहे. किंबहुना ही आमची शेवटचीच वेळ आहे असें आम्हांस यानें कळविलें आहे. थोडक्याच वेळांत यानें किती तरी सैन्य मारून टाकिलें! व बाकीचें राहिलेलें सैन्य हा सूर्योदयापूर्वींच बहुतेक नष्ट करील. भीमार्जुनांचा मारा या माऱ्यापुढें अगदींच पोकळ आहे. या घटोत्कचाला जो जिंकील तोच शेवटीं निश्चयेंकरून विजयश्रीस वरील! बाबा कर्णा! तूं कृपा करून आतां मनावर घे. आणि ती वासवी शक्ति यावर सोड. ती शक्ति ठेवून आतां कांहीं उपयोग नाहीं. कारण दसरा गेल्याशिवाय दिवाळीचा दिवा पाहणें जसें कोंकरांस अशक्य असतें, तसेंच ह्याच्या सपाटयांतून आम्ही राहिलों तरच अर्जुनाशीं युद्धाचा प्रसंग येणार, एरव्हीं, 'इदं च नास्ति' आणि 'परं च न लभ्यते' अशी आमची स्थिति होणार."

मध्यरात्रीं राक्षसानें चालविलेला भडिमार व सैन्याची उडालेली तारांबळ पाहून आणि दुर्योधनाची प्रार्थना ऐकत असतां घटोत्कचानें केलेला स्वसेनेचा अमानुष वध अवलोकन करून, कर्णानें वासवी शक्ति सोडण्याचें मनांत आणिलें. कर्ण यावेळीं सिंहासारखा चवताळलेला होता. म्हणून घटोत्कचास ठार मारण्यासाठीं भगवत्संकल्पाप्रमाणें कर्णानें ती कोणासही सहन न होणारी श्रेष्ठ वैजयंती शक्ति हातांत घेतली. ती उत्कृष्ट व परकायाभेदक शक्ति कर्णाच्या हातांत झळकत आहे, असें पाहतांच घटोत्कच अगदीं भिऊन गेला. व विंध्याचलाएवढा देह धारण करून पळून जाऊं लागला. परंतु ती शक्ति त्यावर टाकितांच प्राणी किंकाळ्या फोडूं लागले, सोसाटयाचे वारे वाहूं लागले, मेघांच्या प्रचंड

गर्जना ऐकूं येऊं लागल्या, राक्षसी माया एकदम लुप्त झाली, व ती शक्ति घटोत्कचाच्या वज्रतुल्य हृदयाचा भेद करून नक्षत्रांतील पोकळींत अदृश्य झाली. ती शक्ति लागतांच घटोत्कचाचा अंत झाला, व कौरव आनंदसमुद्रांत तरंगूं लागले. त्यांनीं कर्णाला मोठ्या थाटानें मिरवीत नेलें.

**कृष्णकृत पाण्डवसांत्वन.**

६. घटोत्कचवधामुळें कौरव हर्षनिर्भर झाले, व पाण्डव दुःखसागरांत बुडून गेले. फक्त श्रीकृष्णाला मात्र अत्यानन्द झाला. हें पाहून अर्जुनानें त्याला आनन्दाचें कारण विचारिलें. तेव्हां तो म्हणाला, " घटोत्कचानें ही वासवी शक्ति नाहींशी करून टाकिल्यानें वस्तुतः आज घटोत्कच मेला नसून कर्णच मरण पावला आहे. आतां माझी धास्ती नाहींशी झाली. कर्णाच्या अंगावर जर कवच असतें व कानांत कुण्डलें असतीं, त्याचप्रमाणें ही शक्तीही जर त्यानें जतन करून ठेविली असती, तर या दुर्योधनानें त्या कार्तिकेयतुल्य वीराच्या साहाय्यानें स्वर्गांतही सर्वांवर जय मिळविला असता. व मग इतरांची गोष्ट तर बाजूलाच असूं दे. प्रत्यक्ष तुझ्या गाण्डीवानें व माझ्या सुदर्शनानेंही हा आपले हातून मेला नसता. कर्णाचा हा पराक्रम मनांत आणूनच इन्द्रानें त्याचीं कवचकुण्डलें हरण केलीं. व तीं कापून दिल्यामुळेंच त्यास 'वैकर्तन' हें नांव प्राप्त झालें आहे. कर्णाजवळ ही शक्ति होती तोंपर्यन्त तो तुला मृतच समजत असे. साम्प्रत कर्ण जरी निर्विष सर्पाप्रमाणें झाला आहे तरी तूं त्याला कांहीं कमी पराक्रमी समजूं नकोस. कवचकुण्डलें जरी नष्ट झालीं आहेत तरीही एक वेळ इन्द्रसुद्धां याशीं लढतांना घाबरून पळून जाईल, असा

कर्ण पराक्रमी आहे. हे अर्जुना! कर्ण हा ब्राह्मण-भक्त, सत्य-वादी, तपस्वी, व्रतस्थ, व शत्रूवरही दया करणारा असल्यामुळेंच यास ‘ वृष ’ असें म्हणतात. हा युद्धनिपुण वृष रणाङ्गणांत प्राप्त झाला असतां तुमचे मोठमोठे सेनानी देखील याच्याकडेस पाहण्यास समर्थ नाहींत.आणि म्हणूनच याच्या हातांत शस्त्र असेपर्यंत हा त्रिभुवनांत सर्वांनाच अजिंक्य आहे. तथापि याच्या वधाला एक युक्ति आहे.ती ही कीं, जेव्हां याच्या रथाचें चक्र जमिनींत रुतून हा महत्संकटांत सांपडेल व असावध होईल तेव्हांच म्हणजे याच्या शस्त्रहीन व असावधान स्थितीमध्यें हा तुझ्या हातून मारिला जाईल, एरव्हीं यास मारणारा वीर साऱ्या त्रिभुवनांत नाहीं. ”

इकडे शक्तिनिक्षेपणाची बातमी धृतराष्ट्रास कळल्यावर तो संजयास म्हणाला, “ संजया! एका वीरास निश्चयेंकरून मारणारी शक्ति कर्णाजवळ असतांना त्यानें युद्धारंभींच अर्जुनाला युद्धार्थ आव्हान करून त्यावरच ती कां टाकिली नाहीं? ज्या शक्तीवर कर्णाची एवढी मदार होती, ती शक्ति वासुदेवानें मोठ्या युक्तीनें घटोत्कचावर टाकवून व्यर्थ घालविली. ज्याप्रमाणें डुक्कर आणि कुत्रा यांच्या लढाईंत कोणीही मेला तरी चांडालाचा लाभच होतो, त्याप्रमाणें कर्ण-घटोत्कचांच्या युद्धांत महाबुद्धिमान् वासदेवानें मात्र आपला फायदा करून घेतला आहे. कर्णाला कोणींही युक्तिवाद कसा सांगितला नाहीं? हा भलताच प्रमाद त्याचे हातून कसा घडला?” तेव्हां संजय म्हणाला, “दुर्योधन, शकुनि, मी व दुःशासन, नित्य रात्रीं कर्णास पार्थावर शक्तिविमोक्षण करण्यास सांगत असूं. व तोहो उद्यां पार्थावर किंवा कृष्णावर शक्ति टाकीन असें आम्हांस आश्वासन देत असे. परंतु दुसरे दिवशीं युद्धासमय प्राप्त

झाला म्हणजे तो देवाधिदेव हृषीकेश पाण्डवांचें कल्याण करण्यासाठीं सदा जागृत असल्यामुळें, कर्णाची वधबुद्धि मोह पावून शक्तिक्षेपणाची त्याला आठवणच राहात नसे. शिवाय कर्णाजवळ शक्ति होती तोंपर्यंत केशवानें अर्जुनास कर्णासमोर आणिलेंच नाहीं. जोंपर्यंत कर्णाजवळ ती शक्ति होती, तोंपर्यंत श्रीकृष्णास रात्रंदिवस झोंप येत नव्हती. व त्याला कशांतच आनंद वाटत नसे. शक्तीचा नाश कसा होईल ? याचाच तो रात्रंदिवस विचार करीत असे. अखेरीस रात्रींच्या वेळीं कर्णास घटोत्कचाशिवाय पीडा दण्यास कोणीही वीर समर्थ नाहीं, असें जाणून त्या शक्तिनाशासाठीं घटोत्कचाची योजना मोठ्या युक्तीनें कर्णावर केली." असो. तात्पर्य, श्रीकृष्णासारखा श्रितरक्षणपटु भक्ताचा नाश कसा बरें होऊं देईल ? व त्याच्याचमुळें कर्ण असा भ्रमला होता.



# ६

# स्तुतिपर्व.

**कर्णास सैनापत्याभिषेक.**

१. पुढें द्रोणाचार्य सेनापति झाल्यापासून पांचवे दिवशीं, म्हणजे एकंदर युद्धाच्या पंधराव्या दिवशीं द्रोणाचार्य प्रायोपवेशन करून बसले असतां त्यांचें शिर धृष्टद्युम्नानें कापून टाकिलें. हें पाहून कौरव-सैन्य भयभीत झालें; व दशदिशांस पळूं लागलें. तेव्हां दुर्योधनानें मुख्य मुख्य योद्ध्यांस एकत्र केलें व आतां सेनापतित्व कोणाला द्यावें? असें त्यांना विचारिलें. त्या वेळीं सर्वांना उद्देशून अश्वत्थामा म्हणाला, "हे वीर हो! **स्वामिभक्ति, देशकालादिकांची अनुकूलता, बल व राजनीति हीं अर्थसिद्धीचीं मुख्य साधनें होत. परन्तु या साधनांना दैवाचें साहाय्य अवश्य पाहिजे.** तें नसल्यानेंच भीष्मद्रोणासारखे रण-धुरंधर योद्धे गेल्या पंधरा दिवसांत शत्रूकडून मारिले जाऊन आतां सेनापति कोणास नेमावें? हा प्रश्न आपल्या सर्वांपुढें येऊन पडला आहे. मला वाटतें, प्रस्तुत प्रसङ्गीं आपण सर्वांनीं मुख्य ध्येयावर लक्ष ठेवून सर्व गुणांनीं सम्पन्न असा सेनापति नेमिला पाहिजे. माझ्या मतें असा सर्वलक्षणसम्पन्न योद्धा कर्ण हा असल्यामुळें, दुर्योधनानें त्यावर सैनापत्याचा अभिषेक करावा. कर्ण हा अति-शय बलिष्ठ, शूर, सर्वशस्त्रास्त्रप्रवीण, शत्रूला असह्य व अजिक्य असा आहे. यासाठीं आपण सर्वांनीं त्यालाच सैनापत्य द्यावें." अश्वत्थाम्याचें हें म्हणणें सर्वांसच मानवलें. हें पाहून दुर्योधन

राजा कर्णास म्हणाला, " कर्णा! पहिल्यापासून माझी भिस्त तुझ्यावरच होती. भीष्मद्रोण हे अतिरथि होते, परन्तु ते वृद्ध व पाण्डवांविषयीं पक्षपाती होते. त्यांच्या हातून गेल्या पंधरा दिवसांत एकही पांडव मारिला गेला नाहीं. आतां मीं पुष्कळ विचार करून पाहिलें, तरी तुझ्यासारखा प्रतापी वीर मला दुसरा कोणी दिसत नाहीं. तूं आमच्या हिताविषयीं नेहमीं तत्पर असतोस, म्हणून देवांचा सेनापति जसा स्कन्द तसा तूं आमचा सेनापति होऊन पांडवांची व पांचालांची त्रेधा उडवून दे! आम्हांला जय प्राप्त करून देण्यास खरोखरी तूंच समर्थ आहेत." हें दुर्योधनाचें अतिशय दीन असें भाषण श्रवण करून कर्ण म्हणाला, "राजा! तूं स्वस्थ ऐस! मी तुझें सैनापत्य स्वीकारून तुला जय प्राप्त करून देतों." कर्णाचें हें भाषण ऐकून त्याजवर सैनापत्याचा अभिषेक करण्यासाठीं दुर्योधनासह सर्व राजांनीं त्याला रेशमी वस्त्रांनीं शृंगारिलेल्या उत्तम आसनावर बसविलें, व शास्त्रोक्त विधीनें त्यावर अभिषेक केला. ब्राह्मणांनीं त्याला मंगलप्रद आशीर्वाद दिले, सर्वांनीं त्याची फारच स्तुति केली, व दुंदुभि वाजूं लागल्या. नन्तर दुर्योधन राजा सर्व सैन्याच्या अग्रभागीं येऊन सर्व सैनिकांस म्हणाला, " सैनिकहो! तुम्ही भिऊं नका! भीष्मद्रोणांच्या वधानें पाण्डव जरी क्षणमात्र हर्षित झाले असले तरीही महात्मा कर्ण त्यांचा रेंच उतरील. तुम्ही सर्वजण त्यास एकदिलानें मदत करा! कर्णाचा पराक्रम सामान्य समजूं नका! नुसत्या मानुष बलानें यानें भीमास शरण आणिलें, व त्याचा अधिक्षेप करून त्याला सोडून दिलें. एवढा पराक्रमी व मायावी घटोत्कच पण त्यासही

यानेंच यमसदनाची वाट दाखविली. " हें उत्साहजनक भाषण ऐकिल्यावर, एकन्दर युद्धाच्या सोळाव्या दिवशीं तिसऱ्या सेनापतीच्या हाताखालीं सर्व कौरवसैन्य युद्धार्थ सिद्ध झालें. कर्ण स्वतः आदित्याप्रमाणें तेजस्वी अशा रत्नखचित रथांत आरूढ झाला होता. त्याच्या रथावर श्वेतपताका फडकत असून, रथाला जोडिलेले अश्वही बगळ्याप्रमाणें पांढरे शुभ्र होते. त्याच्या ध्वजावर नागकक्षेचें ( म्हणजे हत्तीच्या साखळदंडाचें ) चिन्ह होतें. रथामध्यें लहान लहान घण्टा टांगिलेल्या होत्या. रथांत सुवर्णाचे बाण भाते शंभर ठेविले असून गदा व वरूथ ( म्हणजे रथरक्षक कवच) हीं सुद्धां होतीं.त्या रथावर शतघ्नी, शूल व तोमर हीं होतीं अशा रथावर महाधनुर्धर व महारथ कर्ण आरूढ होऊन सुवर्णमंडित धनुष्याचा टणत्कार करिता झाला. तेव्हां तो उदयपर्वतावरील सूर्यासारखा अन्धकाराचा नाश करीत आहे कीं काय, असें सर्वांस भासलें. नन्तर कर्णानें आपला शंख वाजवून सर्व सैन्याची रणाङ्गणावर मकराकार रचना केली व आपण पाण्डवांना जिंकण्यासाठीं स्वतः त्या मकराच्या मुखप्रदेशीं उभा राहिला. हें पाहून युधिष्ठिर अर्जुनास म्हणाला, "अर्जुना ! या कौरवसैन्यांत आतां मला महाधनुर्धर कर्णाशिवाय इतर कोणीही वीर तुझ्याशीं युद्ध करण्यास योग्य दिसत नाहीं. देव, असुर, किन्नर व महोरग यांसहवर्तमान चराचर तीनही लोक, जरी सिद्ध झाले, तरी ते कर्णाला जिंकिण्यास समर्थ नाहींत. हे महाबाहो अर्जुना ! या कर्णाचा आज तूं वध कर. म्हणजे द्वादश वर्षापर्यन्त माझ्या हृदयांत खुपत असलेलें शल्य उपटून टाकिल्याप्रमाणें होईल व आपणांला जय प्राप्त होईल." श्रेष्ठ भ्रात्याचें हें वचन श्रवण करून

अर्जुनानें आपल्या सैन्याचा अर्धचन्द्राकार व्यूह सिद्ध केला. नन्तर मामूल वहिवाटीप्रमाणें दोनही सैन्यांत शंख, भेरी, पणव, आनक, दुंदुभि, झर्झर, डिंडिम इत्यादि महान् महान् वाद्यांचा एकच घोष सुरू झाला. विजयेच्छु शूर योद्धे सिंहाप्रमाणें गर्जना करूं लागले. घोडयांचें खिंकाळणें, हत्तींचा बृंहित नाद, रथचक्रांचा घडघडाट, शस्त्रास्त्रांचा खणखणाट व वीरसिंहांची गर्जना यायोगें सर्व रणांगण कम्पित होऊं लागलें. नन्तर दोन्ही सेना युद्धाविषयीं आतुर होऊन एकमेकांवर धांवून गेल्या व निकराचें युद्ध सुरूं झालें.

२. दोन्ही दळांचें याप्रमाणें निकराचें युद्ध सुरू झाल्यावर कांहीं वेळानें कर्णास असें दिसून आलें कीं, पाण्डुपुत्र नकुल हा मोठया आवेशानें सैन्याची कत्तल करीत आहे. हें पाहून कर्ण त्यावर चालून गेला. त्याला पाहतांच नकुलाच्या अंगाची अगदीं लाही उडून गेली, व तो कर्णास म्हणाला, "अरे दुष्टा कर्णा! तूं फार दिवसांनीं माझ्या तडाख्यांत आला आहेस. अधमा! या सर्व कलहाचें व अनर्थाचें बीज तूंच आहेस! तुझ्या अपराधामुळेंच कौरवपाण्डवांचें युद्ध होऊन हा भयंकर संहार होत आहे. अरे नीचा! तुझ्याच उपदेशावरून साध्वी द्रौपदीला सभेंत ओढून आणिलें होतें. ह्यासाठीं आज या रणभूमीवर मी तुझा वध करून सर्व कलहाचें बीज नाहींसें करून टाकितों." नकुलाचें हें क्रोधयुक्त भाषण ऐकून कर्णानें त्यास शान्तपणें सांगितलें, "नकुला! राजपुत्राला योग्य असेंच तुझें हें भाषण आहे. बा वीरा! तूं आपला पराक्रम प्रकट कर. फार

**कर्णकृत नकुलोपहास.**

बडबड करूं नकोस. पराक्रमावांचून केलेलें भाषण बुबुळांवांचून असलेल्या नेत्रांप्रमाणें व्यर्थ होय. तुझा पराक्रम पाहण्यास मी फार उत्सुक झालों आहे. शूर पुरुष पराक्रम करूनही मुळींच बोलत नाहींत. परन्तु तुझें मात्र त्यांच्या अगदीं उलट आहे. तूं प्रथम मजवर प्रहार कर व तुझें सामर्थ्य मला दाखीव? परन्तु लक्षांत ठेव कीं, या कर्णापुढें तुझा दर्प तेव्हांच जिरून जाईल." याप्रमाणें उभयतांचें भाषण झाल्यावर बरेंच युद्ध झालें. परन्तु त्यांत नकुल हतवीर्य झाला. कर्णानें त्याच्या रथाचे, पताकेचे, रथचक्राचे, गदेचे, खड्गाचे, कवचाचे व इतर सर्व युद्धोपयोगी उपकरणांचेही तिलप्राय तुकडे केले. अशा प्रकारें नकुल हताश, विरथ, निःशस्त्र व विगतकवच होऊन रणांगणांतून पळून जाऊं लागला, तेव्हां कर्ण त्यास धरावयास धांवला, व आपलें धनुष्य त्याच्या गळयांत घालून त्यानें त्याला पकडलें, आणि हंसत हंसत त्याला म्हणाला, "नकुला! वर पहा! प्रथम उगीच बडबड केलीस हें तुझ्या आतां तरी लक्ष्यांत आलें ना? बाळा! पाण्डवपेक्षां कौरव मोठे बलिष्ठ आहेत, ह्यास्तव त्यांच्याशीं युद्ध करण्याचें सोडून दे. हें युद्ध मोठया योद्धयांचें आहे. म्हणून ज्यानें त्यानें तुल्यवीरांशीं झगडत असावें. भलत्याशींच भलत्यानें झगडूं नये. तूं कांहीं मनांत शरमूं नकोस! व खेदही करूं नकोस! जा! मीं तुला जीवदान दिलें आहे. जेथें कृष्णार्जुन असतील, तेथें जाऊन त्यांचा आश्रय कर! किंवा फार वेळ तूं दृष्टीस न पडल्यानें तुझी माता कुन्ती व्याकुल झाली असेल, म्हणून प्रथम घरीं जाऊन तिला भेट!" असें म्हणून त्यानें नकुलास सोडून दिलें, व नंतर पाञ्चालांकडेस आपला मोर्चा फिरविला. मध्यान्हीच्या सुमारास तो पाण्डवसैन्यांत

चक्राप्रमाणें संचार करूं लागला व त्यामुळें त्या सैन्याचा फारच नाश झाला. कित्येकांच्या रथाचीं चक्रें छिन्नभिन्न झालीं, ध्वजा व पताका यांचा चुराडा उडाला, सारथी मरून गेले, अक्ष फुटले व अश्व उधळून गेले. कर्णाच्या बाणांनीं पाण्डवांकडील हत्तींचीं गण्डस्थळें विदीर्ण झालीं, शुण्डा तुटल्या, गात्रें विच्छिन्न झालीं व पुच्छेंही नाहींशीं झालीं. कर्णाच्या भयङ्कर माऱ्यानें अश्वांचीं उरश्छदें ( उरांवरील कवचें ) फुटून गेलीं, शेंपटया कापल्या गेल्या, लगामा तुटल्या आणि चामरें व खोगिरें नाहींशीं होऊन त्यांवरील स्वार मृत्युमुखीं पडल्यामुळें ते घोडे इतस्ततः धावूं लागले; कर्णाच्या बाणसमुदायानें पाण्डवपक्षीय वीरांच्या हातांतील प्रास, खड्ग, वृष्टी, धनुष्यें व भाते यांचा चक्काचूर उडाला. व त्या वीरांचे हस्तपादादि अवयव तुटून गेले. कर्णानें याप्रमाणें पांचालसृंजय वीरांची दुर्दशा केल्यामुळें पांडवसैन्य पळून जाऊं लागलें. याप्रमाणें युद्ध होतां होतां अगदीं सायंकाळीं सात्यकी कर्णावर चालून आला. कर्णसात्यकीचें तुमुल युद्ध झालें, त्यांत सात्यकी अगदीं मेटाकुटीस आलेला पाहून अर्जुन त्याच्या रक्षणार्थ धांवून आला. तो येतांच कर्णानें सात्यकीस सोडून दिलें व त्याच्याशीं तो युद्ध करूं लागला. थोड्या वेळानें सात्यकी सावध झाला व त्यानें धृष्टद्युम्न, शिखण्डी, नकुल, सहदेव, द्रौपदीचे पांचही पुत्र, युधामन्यु, चेकितान, युयुत्सु, उत्तमौजा, युधिष्ठिर व प्रभद्रक एवढया वीरांनिशीं कर्णावर चाल केली, व चोहोंकडून त्यावर सर्वांनीं एकदम शस्त्रवृष्टि करण्यास प्रारम्भ केला. परंतु वीरकर्ण यत्किंचितहि घाबरला नाहीं. त्यानें थोडक्याच वेळांत सर्वांचा पराजय करून त्यांना पळवून लाविलें. एकही वीर जेव्हां कर्णापुढें तगेना, तेव्हां स्वतः अर्जुन त्यावर चालून गेला. कर्णार्जुनांचें

थोडकेंसें युद्ध होतें न होतें तोंच संध्याकाळ झाला, व युद्ध राहिलें. दोनही पक्ष आपणांसच जय मिळाला असें समजून परतले.

**शल्यसारथ्य-योजना.**

३. असो. रात्रीं शिबिरामध्यें सर्व राजे मसलत करण्यासाठीं एकत्र झाले. त्यांत, राजा दुर्योधनास खिन्नान्तःकरणयुक्त असा पाहून, वृषभतुल्य स्कंध धारण करणारा, युद्धांत पुरन्दराप्रमाणें पराक्रम गाजविणारा, मत्त गजाप्रमाणें बलिष्ठ व कार्तवीर्याप्रमाणें वीर्यवान् असा कर्ण म्हणाला, "राजा! तूं काय काळजी करतोस! उदयीक सर्व शत्रु मारून तुला विजयश्री मिळवून देईन. अस्वस्थ होऊं नकोस! आज रात्र झाली म्हणून, युद्ध बन्द करणें भाग पडलें." हें कर्णाचें धीरोदात्त भाषण ऐकून सर्व राजे आनन्दित झाले, व आपआपल्या शिबिरांत निजावयास गेले. प्रातःकालीं नित्यकर्में आटोपून सर्व सैन्य युद्धार्थ सिद्ध झालें. सेनापति कर्णही तेथें प्राप्त झाला, व दुर्योधनाला म्हणाला, "राजा! कार्यबाहुल्यामुळें आजपर्यन्त अर्जुनाचा समाचार घेण्यास मला झालें नाहीं परन्तु आज त्याला ठार मारिल्याशिवाय मी परत फिरणार नाहीं. आज एक तर तो मला मारील किंवा मी तरी त्याला मारीन. आज आमचें युद्ध फार प्रेक्षणीय होईल तें तूं नीट अवलोकन कर. अर्जुन आज मजशीं मुद्दामच गांठ घालील, अशीच युक्ति मी करीन, व वासवी शक्ति नष्ट झालेली आहे हें जाणून अर्जुन आतां मजसमोर येण्यास मुळींच कचरणार नाहीं. परन्तु हरकत नाहीं. माझें आयुध आणि वीर्य हीं अर्जुनाप्रमाणेंच आहेत. मी अर्जुनापेक्षां कित्येक गुणांनीं अधिक आहे. लवकर लवकर बाण सोडणें, शत्रूंच्या शस्त्रास्त्रांचा

तत्काल नाश करणें, दूरच्या लक्ष्याचा अचुक भेद करणें यांत मी अर्जुनाहून अधिक आहें म्हणजे या कामांत अर्जुन मजएवढा प्रवीण नाहीं. शरीरबल, मानसिक बल, अस्त्रनैपुण्य व युद्धविक्रम हे देखील अर्जुनापेक्षां मजमध्यें अधिक वास करीत आहेत. अस्त्रांचा अभ्यास अझूनही मी रात्रंदिवस करीत असतों. व म्हणूनच सर्व अस्त्रें मला करतलामलकवत् अवगत आहेत. अर्जूनाची एवढी तयारी नाहीं. माझा उत्साह तर तुला ठाऊकच आहे. तेव्हां त्याबद्दल विशेष सांगण्याचें प्रयोजन नाहीं. सकल आयुधांमध्यें श्रेष्ठ असें जें विजय नामक धनुष्य तेंही मजजवळ सिद्ध आहे. राजा! या विजय चापाची महती काय वर्णावी? पूर्वी विश्वकर्म्यानें इन्द्रासाठीं हें धनुष्य तयार केलें. इन्द्रानें या धनुष्याच्या साहाय्यानें अनेक दैत्यसमुदाय जिंकिले. असें हें अपूर्व धनुष्य इन्द्रानें नन्तर परशुरामाच्या स्वाधीन केलें. आणि सद्गुरु परशुरामांनीं एकवीस वेळां याच धनुष्यानें निःक्षत्रिय पृथ्वी करून आतां तें मला अर्पण केलें आहें. हें विजय धनुष्य तुझा पार्थवधाचा मनोरथ आज पूर्ण करील. माझ्या विजय चापापुढें गांडीव चापाची मुळींच प्रतिष्ठा नाहीं. म्हणून मी निःसंशय अर्जुनाचा वध करीन, व ही समुद्रवलयाङ्कित पृथ्वी तुला अर्पण करीन. राजा! अर्जुनापेक्षां माझ्या ठिकाणीं काय अधिक आहे, हें मीं तुला सांगितलें. आतां अर्जुनाच्या ठिकाणीं मजपेक्षां काय जास्ती आहे तेंही तुला कथन करतों. शत्रूंच्या गुणांचें वर्णन करण्यास कांहींही हरकत नाहीं. अर्जुनाचा सुवर्णमय रथ, धनुष्य व त्याची प्रत्यंचा, ध्वज, अश्व, ध्वजस्थ मारुति हे सर्व दिव्य व अवीनाशी आहेत. त्याचप्रमाणें त्याचे भातेही अक्षय्य

आहेत. त्यांतील बाण कधींही संपत नाहींत. शिवाय मुख्य गोष्ट अशी आहे कीं, ज्याला सर्व लोक परमेश्वररूप म्हणून समजतात, तो श्रीकृष्ण परमात्मा त्याचा सारथी आहे. हें पार्थाच्या ठायीं मजपेक्षां आधिक्य . आहे. तरीही मी त्याशीं युद्ध करण्यास मनापासून इच्छितों. अर्जुनाहून माझें साहित्य जर अधिक होईल तर मजला खात्रीनें जय प्राप्त होईल. एवढयासाठीं बाणांचे शेंकडों गाडे माझ्या रथामागून चालीव व उत्तम उत्तम अश्वांनीं युक्त असे बलिष्ठ रथ माझ्यामागें तयार असूं देत! त्याचप्रमाणें, राजा! आपल्या पक्षाकडे असलेला हा रणधुरन्धर शल्य कृष्णापेक्षां सारथ्यकर्मांत अधिक कुशल आहे, त्याच्याकडून माझें सारथ्य करीव! मला जर शल्य सारथी मिळेल तर मी युद्धांत निःसन्देह अर्जुनास जिंकीन. माझ्या मनाप्रमाणें जर सर्व युद्धसामग्री जुळली, तर रणांगणांत माझ्याशीं भिडण्यास सुरासुरही समर्थ नाहींत, मग मानुषयोनींत जन्म पावलेल्या पाण्डुपुत्रांची कथा काय ?" दुर्योधनानें हें सर्व कबूल करून बाणांची वगैरे व्यवस्था केली व आपण शल्याकडेस गेला, आणि त्यास विनयपूर्वक वन्दन करून म्हणाला, " हे राजा! कर्णाचें भाषण तूं ऐकिलें आहेसच. आतां तूं मजवर कृपा कर! व कर्णाचें सारथ्य कर!" हें दुर्योधनाचें भाषण ऐकून शल्य फारच रागावला व आपण राजर्षिकुलोद्भव असून आपणास निन्द्य काम सांगितल्याबद्दल त्यानें दुर्योधनाची फारच निर्भर्त्सना केली.परन्तु शेवटीं दुर्योधनाच्या अत्यन्त लीनतेमुळें त्यानें हें काम पत्करिलें व म्हणाला, "राजा! ज्या अर्थी माझी योग्यता कृष्णापेक्षांही अधीक आहे असें तूं भरसैन्यांत म्हणत आहेस, त्या अर्थीं मी कर्णाचें सारथ्य करीन. परन्तु मला जें उचित

दिसेल तें मी कर्णास बोललों असतां तें त्यानें मुकाटयानें सहन केलें पाहिजे.माझ्या भाषणाच्या पथ्यापथ्यतेचा त्यानें विचार करितां कामा नये." कर्णानें कार्याच्या महत्त्वाकडेस लक्ष देऊन हें म्हणणें कबूल केलें. शल्यानें सारथ्य कबूल केल्यावर दुर्योधन त्याला म्हणाला, "राजा शल्या, तूं कर्णास कमी समजूं नकोस.'सूतपुत्र' असा याला फक्त डाग लागलेला आहे. हा खरोखरीच कोणी तरी पराक्रमी क्षत्रियपुत्र आहे. याच्या प्रत्यंचेचा हृदयभेदक ध्वनि कानीं पडतांच पाण्डवसैन्याची गाळण उडून जाईल.ज्या परशुरामानें एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केली त्याचा हा आवडता शिष्य आहे. व तूं जर आज मनावर घेशील तर हा खात्रीनें पार्थाचा वध करील. रात्रियुद्धामध्यें यानेंच घटोत्कचाला ठार मारिलें; भीम, नकुल व सहदेव यांना जर्जर केलें; धृष्टद्युम्न व सात्यकि यांचीही यानेंच खोड मोडिली; व याच्याच भयानें अर्जुन समरामध्यें याला तोंडही दाखवीत नाहीं. हा कर्ण जर एकदां रागावला तर प्रत्यक्ष इन्द्रालाही ठार करील, मग पाण्डवांची कथा ती काय? मात्र आज तूं याचें रक्षण करून उत्तम प्रकारें रथ चालीव, म्हणजे हा पार्थाला निःसंशय जिंकील." याप्रमाणें दुर्योधनाचें भाषण झाल्यावर शल्यानें कर्णाकरितां विजयशाली व मंगलदायक असा रथ यथाविधि सिद्ध करून कर्णापाशीं आणिला. त्या रथांत बसून रथिश्रेष्ठ कर्ण व सारथिश्रेष्ठ शल्य असे उभयतां रणभूमीकडेस जाण्यास निघाले. रथ चालत असतांना शल्यकर्णाचा जो संवाद झाला तो पुढील भागांत वर्णिला आहे.



७

# कर्ण-शल्यसंवादपर्व.

**कर्ण**:—शल्या! जेथें पाण्डव असतील तेथें हा रथ घेऊन चल. तूं रथ कसा हांकतोस तें मी आज पाहीन, व माझ्या बाहूंचें शौर्य कृष्णार्जुनांस दाखवीन. मी सशस्त्र असतां प्रत्यक्ष वज्रपाणि इन्द्रही माझ्यासमोर उभा राहण्यास समर्थ नाहीं. आज मी निश्चयेंकरून निष्पाण्डवी पृथ्वी करीन. जेवढीं शस्त्रास्त्रें ते धरितील तेवढ्या सर्वांचा मी नाश करीन; व कुरुराजाचा मनोरथ मी परिपूर्ण करीन. अर्जुनाला माझ्या बाहूचा प्रताप आज मी चांगलाच दाखवितों.

**शल्य**:—हे सूतपुत्रा! गाण्डीव धनुष्याचा टणत्कार जोंपर्यन्त तूं एकिला नाहींस, तोंपर्यन्तच ही तुझी बडबड चालेल. प्रलयानलासारखा भीम, धर्मात्मा धर्मराज, अनिलानलासारखे नकुलसहदेव हे तुझ्या सैन्याचा धुव्वा उडवून देतांना तुझ्या जेव्हां नजरेस पडेल तेव्हांच तुझे हे प्रताप बंद होतील.

**कर्ण**:-शल्या! सर्वथैव वन्दनीय अशा भीष्मद्रोणांना शत्रूंनीं अधर्मानें मारून आमची वीजयश्री बळेंच ओढून नेली. व मला तर खचीत असें वाटतें कीं, शस्त्रें, शास्त्रें, अस्त्रें, बल, पराक्रम किंवा राजनीति नैपुण्य यांपैकीं कोणाचेंही बळ भवितव्यातेपुढें चालत नाहीं. इच्छामरणी भीष्म व विश्वख्यात गुरु हेही ज्या अर्थी मृत्युवश झाले त्या अर्थी मरण हें कोणासच सोडीत नाहीं हें निसंशय जाणावें. व हें जर खरें आहे, तर प्रत्येकानें

आपलें कर्तव्य सदोदित करीत असावें असा विचार करूनच मी उत्साहयुक्त होऊन युद्धाला निघालों आहें. दुसरें, गुरु व पितामह हे वृद्ध होतें, परन्तु मी तसा नाहीं. म्हणून अर्जुनाचा प्रताप सहन करण्यास मजएवढे ते समर्थ नव्हते. यासाठीं तुला सांगतों कीं, जेथें कृष्णासह पांडव असतील तेथें तूं मला ने. मी युद्धार्थ स्वैर संचार करूं लागलों म्हणजे, हा रुद्र आहे कीं काय ? असा सर्वांना भास होईल. कौरवांनीं आजपर्यंन्त माझें फारच प्रिय केलेलें आहे. म्हणून त्यांचे मनोरथ पूर्ण करण्यासाठीं मी आपल्या सुखांना किंबहुना प्राणांना देखील मुकण्यास सिद्ध आहें. कौरवांनीं आजपर्यन्त मजसाठीं जे कष्ट सोशिले आहेत, त्यांचें फळ आज मी त्यांना देईन. आज आपण ज्या रथावर बसून जात आहोंत तो हा दिव्य रथही तूं सामान्य समजूं नकोस. याला व्याघ्रचर्माचें आवरण असून हा अतिशय बळकट आहे. ज्या रथावर बसून श्रीपरशुरामानें एकवीस वेळां निःक्षत्रिया पृथ्वी केली, तोच हा रथ त्यांनीं मला दिला आहे. या रथावरून मी आज अर्जुनास मारीन. अर्जुनाच्या रक्षणार्थ आज प्रत्यक्ष इन्द्रादि लोकपाल जरी आले, तरी मी त्यांचें निवारण करीन. म्हणून तूं अगोदर अर्जुनाशीं माझी गांठ घालून दे.

शल्यः—हर ! हर ! कर्णा ! तुला युद्धाचा कितीही आवेश आला असला, तरी असलें अमर्याद भाषण करणें योग्य नाहीं. पुरुषश्रेष्ठ धनञ्जय कोणीकडे ? आणि पुरुषाधम तूं सूतपुत्र कोणीकडे ? अरे, छपन्न कोटी शूर यादवांच्या वेढ्यांतून कृष्णभगिनी सुभद्रा ज्यानें उचलून आणिली, ज्यानें प्रत्यक्ष शंकराबरोबर युद्ध केले, ज्यानें सर्व खाण्डववन अग्नीस अर्पण केलें, ( ज्या घोषयात्रेच्या

तुला नेहमीं स्मरण असावें त्या ) घोषयात्रेंत दुर्योधनाला ज्यानें बन्धमुक्त केलें व ज्यानें उत्तरगोग्रहणप्रसंगीं भीष्मद्रोणादि सर्व योद्धयांना एकटयानें जिंकिलें, त्या फाल्गुनाची बरोबरी करणारा वीर या सर्व विश्वांत एक तरी आहे काय? तुझा कार्याकार्यविचार सुटला, यावरून तुझ्या मृत्यूची घटका जवळ आली असें वाटतें. तूं हा वेडेपणा सोडून दे व ही बडबड बंद कर!

कर्णः—शल्या! मागच्या गोष्टी आज आठविण्यांत काय अर्थ आहे? आज जर अर्जुन मला जिंकील, तर तुझें भाषण मी खरें मानीन. तूं रथ चालीव. आज जो मला अर्जुन दाखवील, त्याला मी, तो मागेल तेवढें द्रव्य, देईन. आज कृष्णार्जुनांना युद्धांत परमगति प्राप्त करून देईन.

शल्यः—कर्णा! मूर्खासारखा धन कां नासतोस? शहाणे सत्पात्रीं दान करीत असतात. कृष्णार्जुनांना मारीन म्हणतोस हा तुझा कोण मूर्खपणा! कोल्ह्यानें सिंहाला मारावें, किंवा पतंगानें दीपाचा नाश करावा, त्याप्रमाणेंच तूं कृष्णार्जुनांना मारावेंस! कार्याकार्याचा तुला विचार नाहीं व तोंडाला येईल तें बडबडतोस, यावरून तुझें मरण जवळ आलें आहे, असें मला वाटतें.

कर्णः—शल्या! मी स्वतःच्या बाहुबळानें अर्जुनाचा पराभव करण्याचें ठरविलें आहे. तूं मात्र दिसावयाला मित्र परन्तु वस्तुतः खरा शत्रुच आहेस. म्हणजे तूं हितशत्रु आहेस. वारंवार भीमार्जुनांची प्रशंसा करून मला भीति घालूं पाहातोस, पण हें व्यर्थ आहे. तुझी किंवा इतर कोणत्याही मर्त्याची काय कथा! प्रत्यक्ष इन्द्र देखील मला आतां रणांगणांतून परतवूं शकणार नाहीं.

शल्यः–तुझ्या क्रूर कृत्यांना स्मरून अर्जुन जेव्हां तुजवर प्रहार करील तेव्हांच, कर्णा! तुला पश्चात्ताप उत्पन्न होईल. अर्जुन समोर दिसतांच, कर्णा! तूं रणांतून पळून जाशील. तो दिसेपर्यंत तुझी वल्गना चालूं दे. तुझी स्थिति कुत्र्यासारखी आहे. तुकडा घालणाराच्या दाराशीं बसून तो जसा येणाराजाणाराच्या अंगावर भुंकत असतो तसाच, कर्णा! तूंही कौरवांच्या शत्रूंवर भुंकण्याचें काम करितोस.

कर्णः—शल्या! गुणी मनुष्यच गुणज्ञ असतो. मूर्खाला गुणांची काय किंमत? प्रसववेदना वांझेला काय ठाऊक? अर्जुनाचीं शस्त्रास्त्रें व त्याचें दिव्य चाप, त्याचप्रमाणें त्याचें वीर्य व त्याचा क्रोध हीं मला माहित आहेत. त्याचप्रमाणें माझें वीर्यही मला अवगत आहे. मजजवळ एक सर्पाकृति बाण आहे, त्याचे योगें मी आज निःसंशय अर्जुनाचे प्राण हरण करीन सर्व यादवांची श्री त्या कृष्णाच्या ठिकाणीं प्रतिष्ठित आहे, व सर्व पाण्डवांचा जय त्या एकट्या अर्जुनाच्या ठायीं वसत आहे, अशा दोघांची गांठ पडत असतां कोणता स्वहितेच्छु मागें घेईल बरें? हे दोन कृष्ण मजवर चालून आले असतां जगत्त्रयांत मी धन्य होईन. हाच युद्धप्रसंग मला हर्षप्रद होवो! याच शुभ प्रसंगाची मी फार दिवसांपासून वाट पाहात होतों. कृष्णार्जुन अंगावर चालून येत असतां आनन्द मानावयाचा कीं भीति बाळगावयाची? शल्या! तूं मूढ आहेस, तुला संगरपांडित्य काय माहित? तूं फार भ्यालास व म्हणूनच फार बडबड करून शत्रूची प्रशंसा करितोस. मृत्यूच्या भयानें तुझा धीर खचलेला आहे. आतां यापुढें तरी तूं मुकाट्यानें रहा! नाहीं तर त्या दोघांप्रमाणें तुझाही माझ्या हातून आज वध होईल. तूं हितशत्रु आहेस. हें पुनः एकदां मी तुला

बजावितों. कृष्णार्जुनांना मारावें किंवा त्यांचे हातून मरावें हा आज माझा निश्चयच झालेला आहे. केव्हां तरी या नश्वर देहाचा त्याग करून जाणें भाग आहे. मग मृत्यूला कां भ्यावें? एक कृष्ण आणि एक अर्जुन अशा दोघांचीच कथा काय? असले हजारों कृष्ण व हजारों अर्जुन जरी आज मजपुढें आले तरी त्यांनाही मी यमसदनाला पाठवून देईन. पूर्वी मीं ब्राह्मणांच्या तोंडून असें ऐकिलें होतें कीं, तुझ्या देशांत म्हणजे मद्र देशांत मिथ्याभाषण, मित्रद्रोह, व्यभिचार व मांसाशन हे दुर्गुण प्रत्येक व्यक्तिमात्राच्या ठिकाणीं दिसतात. या पूर्वकथित गोष्टीची आज मला तुझ्या उदाहरणानें सत्यता पटली. मला उपदेश करण्यास फक्त श्रीपरशुरामच समर्थ होत. तुझ्यासारख्या पापी मनुष्याचें तें काम नव्हे. अनंत जन्मांच्या पुण्यसंचयानें क्षत्रियाला धारातीर्थी मरण येतें, व पुढें त्याला उत्तम गति मिळते, असें परशुराम गुरूंनीं मला सांगितलें आहे, तें सत्य आहे. म्हणूनच आजचा प्रसंग व्यर्थ दवडणें हें मजकडून कालत्रयींही होणें नाहीं. शत्रूंनीं तुझा भेद केला आहे असें स्पष्ट दिसतें. परन्तु जों जों तूं शत्रूचें वर्णन करिशील, तों तों हा कर्ण भिण्याच्या ऐवजीं अधिकच खवळेल. मजला आजच्या युद्धाभिप्रायापासून कोणीही परत फिरवूं शकणार नाहीं. मी अर्जुनवधाचें मित्रकार्य आज करीन. म्हणून पुनः एकदां तुला बजावितों कीं, तूं चूप रहा! नाहीं तर लोकापवाद, सहज क्षमा व आजचें युद्धकार्य या तीनही गोष्टी बाजूस ठेवून माझे हात तुझा वध करितील.

शल्यः—कर्णा! ज्यांनीं धर्मन्यायानें राज्य केलें, ज्यांनीं गोब्राह्मणांचें रक्षण केलें, जे अभिमुखशस्त्राघातानें समरांगणांत मुक्त झाले, जे संग्राममध्यें कधींही पळाले नाहींत, ज्यांनीं शेंकडों

यज्ञ केले व जे मूर्धाभिषिक्त राजे होते; त्यांच्या शुद्ध वंशांत उत्पन्न होऊन तुला वर देऊन मी तुझा रथ चालवीत आहें. मी कांहीं सूत किंवा रथ हांकणारा नव्हे, ही गोष्ट लक्षांत ठेवून तूं भाषण करीत जा! तुझ्या हिताची गोष्ट सांगत असतां तूं मलाच मारावयास उठतोस याला काय म्हणावें? सारथीनें रथीचें रक्षण करावें असा धर्म आहे, व मी त्याप्रमाणें वागत आहें. तूं मात्र वेड्यासारखा मजवरच रागावतोस. नीचानें थोराशीं स्पर्धा करूं नये, याविषयीं तुला एक दृष्टांत सांगतों. पूर्वी समुद्रकांठीं एक वाणी राहत असे. त्याला बरींच मुलें होतीं. तीं मुलें एका कावळ्यास दररोज उच्छिष्ट अन्न वगैरे पदार्थ खाऊं घालीत असत. त्यामुळें इतर कावळ्यांच्या मानानें हा कावळा बराच पुष्ट झाला होता. एके दिवशीं त्या समुद्रतीरीं कांहीं हंस आले. त्या हंसांचीही या बलिपिण्डपुष्ट कावळ्यानें हेटाळणी केली. पुढें त्यांशीं पैज मारून त्यांपैकीं एका हंसाबरोबर तो आकाशांत उंच उडाला. थोडा वेळ इकडे तिकडे उडून हंस समुद्रावर आकाशांत पश्चिम बाजूला झपाट्यानें चालला; त्याच्या मागोमाग कावळाही निघाला. परन्तु या स्पर्धेत सागरतीर दूर राहिल्याचें कावळ्यास भानही राहिलें नाहीं. उडतां उडतां कावळा थकला, व चोहोंकडे पाहूं लागला. तों काय! जिकडे तिकडे गम्भीर व अपार असा समुद्रच दिसूं लागला. पक्षांचें बळ अगदींच सम्पल्यानें तो आतां पाण्यांत पडण्याच्या बेतांत होता. परन्तु (जोडीदार) हंसानें दया करून त्याला तेथून उचलून पूर्व ठिकाणीं आणून ठेविलें. यांतील तात्पर्य असें झालें कीं, दुष्ट असतात ते कावळ्यासारखे वागतात. व सज्जन असतात ते हंसासारखे वागतात. कर्णा! तुझी स्थिति त्या कावळ्या-

सारखी झालेली आहे. त्याला ज्याप्रमाणें वैश्यपुत्रांनीं उच्छिष्ट चालून पुष्ट केलें होतें, त्याचप्रमाणें तुलाही धृतराष्ट्रपुत्रांनीं पुष्ट केलें आहे. उत्तरगोग्रहण, घोषयात्रा, जयद्रथवध इत्यादि प्रसंगीं तुझा पराक्रम आम्हीं पाहिलाच आहे. असला तूं पळपुटा वीर अर्जुनाच्युतांचा वध करणार ! व तो आम्ही पाहणार ! तूं आपलें चरित्र डोळ्यांपुढें आण ! व केशवार्जुनांच्या पराक्रमांचें स्मरण कर. म्हणजे तरी तुझ्या चवचाल जिभेला आळा बसेल. कर्णा ! अझून तरी सावध हो आणि हा युद्धाचा हट्ट सोडून दे. विनाकारण काळाचा पाश कां घालून घेतोस ?

**कर्ण:**—अरे ! मरणाला मी भीत नाहीं. माझ्या धैर्याची अझूनही तुला कल्पना नसावी हें आश्चर्य आहे. कृष्णार्जुनांना मी उत्तम प्रकारें जाणितों, हें तुला किती वेळां सांगूं ? आतांपर्यंतच्या भाषणावरून तूं माझा शत्रु आहेस हें तर निश्चित झालेंच. आतां माझें मर्म तुला सांगतों, ऐक. ब्रह्मास्त्र प्राप्त व्हावें या हेतूनें विप्रवेष घेऊन मी परशुरामांजवळ गेलों; व त्यांची उत्तम प्रकारें उपासना केली. एके दिवशीं श्रीराम माझ्या मांडीवर डोकें ठेवून निजले असतां अर्जुनाच्या हितासाठीं* इन्द्रानें खालून माझी मांडी फोडिली. एकाद्या उंदरानें भिंतीला जसें आरपार भोंक पाडावें किंवा एकाद्या भुंग्यानें जशी तुळई कोरावी, तशीच इन्द्रानें माझी मांडी कोरिली. त्याचे दुःसह दांत आंत रुपत असतां मी यत्कि-

* शान्तिपर्वांत ही गोष्ट पुनः आलेली आहे. परन्तु तेथें नारद इन्द्राचें नांव न सांगतां अलर्क नांवाच्या एका राक्षसाचें नांव सांगतात. हा अलर्क शापानें मलमूत्रभक्षक कीटक झाला होता, व तो परशुरामाच्या दृष्टिपातानें उद्धरून गेला, असें तेथें सांगितलें आहे.

चितही न गडबडतां मोठ्या धैर्यानें राम गुरु जागे होऊं नयेत म्हणून निश्चळ बसून राहिलों होतों. त्या वेळीं मला किती पीडा झाली असेल याची कल्पना कर. व त्यावरून जर तुला माझ्या धैर्याचा अंदाज बांधितां आला तर पहा ! राम गुरूच्या निद्राभंगाच्या भीतीनें मी निश्चळ बसलों खरा, परन्तु माझ्या मांडीतून जें रक्त निघालें त्याच्या स्पर्शानें परशुराम जागे झालेच. व त्यांनीं घडलेला प्रकार पाहून मला म्हटलें, "तूं कोण आहेस ? खरें सांग. इतकें दुःख सहन करणें हें कांहीं ब्राह्मणाचें काम नव्हे." पुढें मीं त्यांस खरी हकीकत सांगितली. परन्तु माझ्या प्रथमच्या असत्य बोलण्यानें त्यांनीं मला असा शाप दिला कीं, "प्रतिज्ञारक्षणाच्या वेळेला तुला अस्त्रस्मृति राहणार नाहीं. म्हणजे अमुक प्रतिज्ञापूर्तीसाठीं अमुक अस्त्राचीच योजना करावी याचें तुला भान राहणार नाहीं. व जेव्हां तुला मरण येईल तेव्हां ब्रह्मास्त्र तुला स्फुरणार नाहीं." शल्या ! परशुरामाचें हें वचन कधींही मिथ्या होणार नाहीं. तथापि अर्जुनासारख्याचा वध करण्यास ब्रह्मास्त्र पाहिजे कशाला ? मजजवळ जो सर्पाकृति बाण आहे असें मीं तुला नुकतेंच सांगितलें तो सोडून मी त्याचे प्राण हरण करीन. कुन्तीपुत्र अर्जुन व त्याचा सहायक देवकीपुत्र श्रीकृष्ण अशा उभयतांनाही मी चांगल्या प्रकारें ओळखून आहें, हें तुला आणखी एकदां बजावून सांगतों. आज मी त्यांना मारीन किंवा कृष्णाच्या चक्रानें मी तरी मरून जाईन. कोणच्या तरी प्रकारानें सत्कीर्ति व्हावी, एवढाच हेतु आहे. तूं भितरा आहेस, मूर्ख आहेस, दुष्ट आहेस, निष्ठुर आहेस, क्षुद्र आहेस, नीच आहेस व हितशत्रु आहेस. माझा तेजोवध करण्यासाठीं घटकोघटकीं माझी निन्दा करितोस व शत्रूची स्तुति करितोस; मित्रांवर निरतिशय

प्रेम करणें, त्याला तृप्त करणें, हीं सन्मित्राचीं लक्षणें होत. हीं सर्व लक्षणें माझ्या ठिकाणीं मूर्तिमन्त वास करीत आहेत. व म्हणूनच दुर्योधनाची कामनापूर्ति आज मी करीन. गुरुशापाचें एक मर्म तुला सांगितलें. आतां विप्रशापाचें माझें दुसरें मर्म तुला सांगतों. शत्रूला देखील माझीं अनेक वर्मे सांगतों, यावरून तूं माझ्या धैर्याची परीक्षा करावयास पाहिजे. अस्त्रांसाठीं रात्रींबेरात्रीं रानावनांतून फिरत असतां माझ्या शरसन्धानानें एका ब्राह्मणाच्या गाईचें वासरूं मरून पडलें. वस्तुतः हें कर्म अज्ञानानें घडलें. परन्तु तो ब्राह्मण अतिशय कोपला, व त्यानें मला असा शाप दिला कीं, " भयंकर युद्धामध्यें तुझें रथचक्र ही भूमि गिळील ! " शल्या ! हे दोन शाप मीं तुला सुहृद्भावानें सांगितले, किंवा मीं तुला करपटाप्रमाणें समजून सांगितले, असेंही पाहिजे तर तूं समज. तात्पर्य, मला अधिक क्रोध येऊं नये म्हणून वारंवार तुला बजावितों. जर का मला क्रोध आला, तर तुझें चंदन तेव्हांच उडवून देईन. तूं सारथ्य करावेंस, म्हणजे तुझ्या बळावर मीं लढावें असा मुळींच माझा हेतु नाहीं. हजारों शल्यही माझ्या या दोन हातांची बरोबरी करूं शकणार नाहींत. अद्यापही तुझी मला दया येते. म्हणून तूं अजून वांचला आहेस. तरी शहाणपणानें स्वस्थ बैस कसा !

शल्यः—कर्णा ! तूं मला भीति दाखवितोस होय ? हजारों कर्ण जें कार्य करूं शकणार नाहींत, तें हा एकटा शल्य करील. तूं काय आपल्या मनांत समजतोस ? तुझ्या बळाची घमेंड क्षणार्धांत उतरून टाकीन. ' मारीन, ' ' मारीन ' म्हणून मला काय एवढें

टरकावितोस ? नीट संभाळून यापुढें बोल. नाहीं तर तूंच माझ्या हस्तें मरण पावशील.

याप्रमाणें उभयतांचें भाषण अगदीं निकरावर येऊन दोघेही युद्धार्थ सिद्ध झाले. हें पाहून दुर्योधन तेथें धांवत आला, व त्यानें मोठ्या मिनतवारीनें उभयतांचें समाधान केलें. नन्तर शल्यानें कर्णाचा रथ समरांगणांत नेऊन उभा केला.



## ८

# अधिक्षेपपर्व.

कर्णकृत धर्माधिक्षेप.

१. मागील प्रकरणीं सांगितल्याप्रमाणें कर्ण रणभूमीवर प्राप्त झाल्यावर त्यानें आपल्या सेनेचा बार्हस्पत्य नांवाचा व्यूह रचून युद्धाची पूर्व तयारी केली. या व्यूहाचा भेद करणें म्हणजे त्याच्या सेनापतीचा वध करणें हेंच मुख्य कार्य होय. या दिवशींच्या युद्धांत कर्णानें आपल्या शौर्याची व पराक्रमाची अगदीं सीमा केली. सात्यकि, द्रौपदेय, धृष्टद्युम्न, भीम, नकुल, सहदेव हे कोणीही त्याच्या पुढें उभे राहूं शकले नाहींत. हें पाहून युधिष्ठिर मोठ्या धैर्यानें त्याच्याशीं लढण्यास आला व त्याला म्हणाला, "हे नीचा, सूतपूत्रा, कर्णा ! तूं दुर्योधनाच्या इच्छेनुरूप वागून आम्हांस निरंतर त्रास देतोस व जिष्णूशीं स्पर्धा करितोस; परंतु आज तुझें बल, तुझी द्रोहबुद्धि व तुझा प्रताप या सर्वांचाच मी लय करून टाकितों." कर्णानें यावर कांहींच उत्तर दिलें नाहीं. पुढें उभयतांचें कांहीं वेळ युद्ध झालें. परंतु थोडक्याच वेळांत राजा धर्म हताश होऊन रणांतून पळून जाऊं लागला. हें पाहून कर्णानें आपल्या वज्र, छत्र, अंकुश, ध्वज, कूर्म, अम्बुज इत्यादि लक्षणांनीं युक्त अशा सुंदर हस्तानें त्याला धरिलें. हें पाहून शल्य म्हणाला, " बा कर्णा, या तीव्रतपोनिधि राजाला मारूं नकोस, सोडून दे!" कर्णालाही या वेळीं कुंतीच्या वचनाची आठवण झाली, व त्यानें धर्मास म्हटलें,

"राजा धर्मा! शुद्ध क्षत्रियकुलांत जन्म घेऊन तूं क्षत्रियधर्मपालन करण्याचे ऐवजीं भयभीत होऊन प्राणरक्षणासाठीं घोर समरांगण सोडून पळून जातोस, हें सर्वथैव निन्द्य होय. मरणाच्या त्रासानें क्षत्रियानें पळून जावें हें सर्वथा अनुचित आहे. तूं ब्राह्मणधर्मप्रवीण दिसतोस, क्षत्रधर्मकुशल नाहींस; म्हणून तूं स्वाध्याय, यज्ञानुष्ठान इत्यादिकांत मग्न असावेंस हेंच उत्तम. इतःपर तूं वीरपुरुषांच्या वाटेस जाऊं नकोस, व त्यांना अप्रियही बोलत जाऊं नकोस. निदान मजसारख्याला तरी भलतेंच बोलत जाऊं नकोस. तूं फार तर बरोबरीचा वीर पाहून त्याच्याशीं युद्ध करीत जा. मी तुला आतां सोडून देतों व जीवदान देतों. जा! जेथें कृष्णार्जुन असतील तेथें जा, किंवा आपल्या घरीं निघून जा!" इतकें बोलून धर्माला कर्णानें सोडून दिलें. परन्तु थोडया वेळानें फिरून धर्म कर्णाशीं झुंजण्यास आला. या वेळीं तर कर्णानें त्याला अगदीं जर्जर केलें, व त्याच्या शरीरावर हजारों जखमाही केल्या. त्यामुळें धर्मराज व्याकुळ होऊन लढाईंतून अंग काढून आपल्या शिबिरांत पळून गेला. पुढें भीमार्जुनादि सर्व मुख्य मुख्य योद्धे कर्णाशीं लढण्यास आले. परंतु कर्णाच्या मान्यापुढें एकही वीर टिकेनासा झाला. शेवटीं शेवटीं तर कर्णानें अगदीं प्रलय करून सोडिला. पांडवसैन्यावर त्यानें भार्गवास्त्र सोडिलें. त्या अस्त्राच्या प्रभावानें एकदम दहा कोटि व दहा लक्ष वीरांचीं शिरकमलें तुटून खालीं पडलीं. असला भयंकर सेनाविध्वंस भीष्मद्रोणांनींही केला नव्हता. 'वीररसाची मूस,' अशी ज्या पार्थाला भीष्मानें पदवी दिली होती, तो पार्थ देखील हें कर्णाचें शौर्य पाहून घाबरला व रणांतून पळून जाण्याचा विचार करूं लागला. तो कृष्णाला म्हणाला, "कृष्णा! परशुरामानें जें

भार्गवास्त्र कर्णाला शिकविलें होतें, त्या अस्त्राचा प्रयोग आतां यानें केला आहे. या अस्त्राचें निवारण मजजवळ नाहीं. कर्णानें आज निःसंशय आमचा पराभव केला. हा टवकारून वारंवार मजकडेस पाहत आहे. त्यावरून हा आज माझे हातून मरेलसें मला कांहीं वाटत नाहीं. यापुढें आज रणांतून पळून जावें हें तर मरणाहूनही वाईट आहे, व याशीं युद्ध करावें तर हाच माझा निश्चयेंकरून अन्त करील. अशा समयीं काय करावें, हें मला तर कांहींच सुचत नाहीं." अर्जुनाचें हें भाषण ऐकून कृष्णास वाटलें कीं, याउपर याचा अन्त पाहण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ज्या प्रसंगास आपण फार दिवसांपासून भीत होतों तोच आज येऊन ठेपला आहे. या वेळीं हा भयविव्हल झाला आहे. रणांतून या वेळीं याला बाजूला नेलें नाहीं तर कर्ण याचा निःसंशय अन्त करील. असा पोक्त विचार करून तो अर्जुनास म्हणाला: "अर्जुना! या समरांगणांत धर्म कोठेंच दिसत नाहीं. तो शिबिरांत गेल्याचें कळतें, तर प्रथम त्याचा समाचार घेऊं चल. घटकाभर युद्ध सोडून दे." अर्जुनास हें पाहिजेच होतें. त्यानें तत्काल आपली सम्मति दर्शविली. व याप्रमाणें हे दोघेही बाहेरून धर्माच्या निमित्तानें पण आंतून पूर्णपणें कर्णभयाकुल होऊन शिबिरांत निघून गेले. अर्जुन या वेळीं रणांतून पळून गेला नसून धर्मराजास भेटण्यासच गेला असें भारतकारांनीं दाखविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला आहे, परन्तु तो सिद्धीस गेला नाहीं. याला आणखी एक प्रमाण सांगतों. शिबिराकडे जातां जातां रस्त्यांत भीम भेटला. त्याला धर्माची हकीकत अर्जुनानें विचारिली. तेव्हां तो म्हणाला, "कर्णाच्या बाणांनीं धर्मराजा व्याकुळ होऊन परत शिबिरांत गेला आहे. त्याचा समाचार घेण्यास तूं जा पाहिजे तर." यावर अर्जुन

म्हणाला, " या संशप्तक वीरांचा नाश केल्याशिवाय मला येथून जाणें शक्य दिसत नाहीं, म्हणून तूंच जाईनास परता." भीम म्हणाला, " रणांतून मी जर आतां गेलों तर शत्रु मला भितरा म्हणतील. मी या रणांतून एक पदभर देखील मागें फिरणार नाहीं. तूं जा. तुझे संसप्तक आणि कौरव हे दोघेही मजशीं युद्ध करूं देत." हें ऐकून अर्जुन शिबिरांत गेला. भीमाच्या मताप्रमाणें हें पळायनच होतें. अस्तु.

२. अर्जुनाला रणांतून आलेला पाहतांच धर्मराजास मोठा आनन्द झाला, व तो म्हणालाः—

धर्मः—वा अर्जुना! तूं कर्णाला मारून आलास! फार चांगलें केलेंस. परशुरामाचा प्रिय शिष्य, प्रख्यात, पराक्रमी व आमचा काळच असा कर्ण तूं कोणत्या अस्त्रानें मारिलास? भीष्मद्रोणांनींही जें केलें नाहीं तें कर्णानें केलें. माझें शरीर कसें अगदीं सोलून टाकिलें आहे. क्षत्रियाला रणपळायन अनुचित. पण तें सुद्धां मीं केलें. परशुरामाचेंच तेज त्याला आलेलें दिसत होतें. कोणीही योद्धा त्यापुढें टिकेना. कर्ण जीवन्त असेपर्यन्त मला सर्वच कर्णमय वाटत होतें. ज्याचा पराक्रम इन्द्रासारखा होता, ज्याचें अस्त्रवेतृत्व परशुरामाप्रमाणें होतें, बळानें जो सागराप्रमाणें होता व जो अर्जुनवधाची प्रतिज्ञा वारंवार बोलून दाखवून कौरवांस हर्षित करीत होता, तो दुष्ट कर्ण तूं कसा रे मारिलास? आज अर्जुन मारिल्याशिवाय जो परत फिरणार नव्हता तोच आज अर्जुनाच्या हातून कसा वध पावला? वस्त्रहरणप्रसंगीं ज्यानें आमची अवाच्य व मनसोक्त निन्दा केली, त्या कर्णास—या बळार्णवास—मारून तूं कृतकृत्य झालास. मला हें वधवृत्त सविस्तर कथन कर.

अर्जुनः—महाराज! संशप्तकांना मारीत असतांना अश्वत्थामा मजवर चालून आला. कर्णानें भार्गवास्त्राचें प्रदीपन करून आपल्या सैन्याचा फारच नाश केला. राजा! कर्ण काळाप्रमाणें आपल्या पक्षांतील वीरांचा नाश करीत होता हें पाहून त्याच्या पुढें उभें राहणें मला भीतिप्रद वाटूं लागलें. व त्याच वेळीं तुझाही रथ मला रणाङ्गणांत दिसेना. तेव्हां तर मी फारच भयविवश झालों, व प्रथम तुझा शोध करीत हा येथें आलों. आतां मला तुझ्या दर्शनानें अपरिमित बळ चढलें आहे. मी प्रतिज्ञापूर्वक सांगतों कीं, आज मी कर्णाचा निःसंशय वध करीन. तो पाहण्यास तूं युद्धभूमीवर चल. मी समरामध्यें भीमाला एकटाच सोडून आलों आहें, म्हणून मला जाण्यास अनुज्ञा दे!

धर्मः—माझ्या पायांचें दर्शन घेण्यासाठीं भीमाला एकट्याला संकटांत टाकून तूं येथें आलास काय? माझ्या दर्शनाचें निमित्त मात्र तूं सांगतोस पण खरोखरी तूं कर्णाला भिऊनच येथें पळून आलास. धिक्कार असो तुला नपुंसकाला! द्वैतवनामध्यें कर्णवधाचा पण तूं कशाला केलास? तुझें समरपाण्डित्य आम्हांसारख्यांनीं वाखाणावें एवढ्याच योग्यतेचें आहे, अशी आज माझी खात्री झाली आहे. तूं जर कर्णवधाचा पण केला नसतास तर मीही हा एवढा दारुण रणसङ्ग्राम करण्याच्या भानगडींत पडलों नसतों. तेरा वर्षेंपर्यंत निव्वळ मी तुझ्यावर भरंवसा ठेवून कसा तरी धीर धरिला. त्या वेळीं असें वाटत होतें कीं, या सर्व दुःखांचा परिहार, युद्धसमयीं कर्णाचा वध करून, अर्जुन करील. परन्तु आज पाहतों तों, सर्वच उलटें दिसतें. अर्जुना! असा तूं पळपुटा मुलगा पृथेच्या उदरीं येण्याऐवजीं ती गरोदर असतांनाच तूं गर्भांतून कां रे गळाला नाहींस! तूं आपल्या शौर्याचा भरं-

वसा देऊन आम्हांला ऐन वेळीं फशीं पाडिलेंस. शतशृङ्गपर्वतावर तुझा जन्म झाला त्याच्या सातव्या दिवशीं अशी आकाशवाणी झाली कीं, ' हा मुलगा सर्व क्षत्रियांमध्यें श्रेष्ठ होईल, खाण्डववन अग्नीस अर्पण करील व सर्व कौरवांचा निःपात करील. याच्या-सारखा धनुर्धर पृथ्वीवर कोणीही असणार नाहीं.' अर्जुना ! कर्णा-समोर पळतांना ही नभःसरस्वती देखील तूं खोटी ठरविलीस ना! मनुष्यच नव्हेत, परन्तु देवही खोटें बोलूं लागले काय ? अर्जुना ! तूं शूर कसला ? तुझा रथ अविनाशी; रथाच्या वरील ध्वज प्रत्यक्ष हनुमान् संभाळितो; रथाचे घोडे दिव्य म्हणजे त्यास भीतिच नाहीं; तुझा सारथी प्रत्यक्ष परमेश्वर जन्ममृत्युजराविरहित; तुझे भाते अक्षय्य व तुझें धनुष्य कधींही न मोडणारें. असलें दैवी साहित्य तुजजवळ असूनही ज्या अर्थी तूं कर्णासमक्ष पळून आलास त्या अर्थी तूं साधारण क्षत्रियांहून फारच हीन योग्यतेचा आहेस. अरे ! असलें दिव्य साहित्य एखाद्या कलीवाला असतें तर, त्यानेंही कर्णवध हां हां म्हणतां केला असता. आतां यापुढें तरी आपलें गाण्डीव धनुष्य श्रीकृष्णाला दे. अथवा कृष्णाला कशाला, आपल्या सैन्यांतील कोणाही वीराला दे. अथवा भीमा-लाच दे. तो तरी माझा मनोरथ पूर्ण करील. अर्जुना ! तूं लढाईंत निःशस्त्र झाला नाहींस, तूं विरथ झाला नाहींस, तूं सारथिहीन झाला नाहींस किंवा एकही बाण तुझ्या मर्मीं शिरला नाहीं. असें असतांना रणांतून पळून येण्यास तुला शरम कशी रे वाटली नाहीं?

येथें एक गोष्ट वाचकांस सुचवून ठेवावयाची आहे, ती अशी कीं, ' गाण्डीव धनुष्याचा त्याग करून तें दुसऱ्याला दे, ' असें जो म्हणेल, त्याला तत्काल ठार मारावें, असा अर्जुनाचा गुप्त पण होता. त्याचप्रमाणें जो भीमाला ' बल्लव ' म्हणजे आचारी असें

म्हणेल ( कारण भीम हा अज्ञातवासांत विराट राजाच्या घरीं बल्लव म्हणून चाकरीस राहिला होता. ) त्यालाही तत्काल ठार मारावें असा भीमाचाही पण होता. ' आपलें गाण्डीव दुसऱ्याला दे ' असें धर्माच्या तोंडून निघतांच अर्जुन एकदम रागावला व तलवार घेऊन धर्मास मारण्यास धांवला. हें पाहतांच श्रीकृष्ण म्हणाले:—

अर्जुना! हें काय? सध्यां तूं रणभूमीवर नसून आपल्याच शिबिरांत धर्मराजासमोर उभा असून तलवार कोणावर उपसतोस? ज्यावर तलवार घेऊन धांवावें असा एकही शत्रु मला तर येथें दिसत नाहीं. दुर्योधनादि कौरव, रणांमध्यें आहेत. तूं येथें धर्मराजाला पाहण्यास आलेला असून तो सुखरूप आहे, असें दिसतांच तुला हर्ष व्हावयास पाहिजे. अशा हर्षनिर्भर स्थितींत हें काय आरंभिलें आहेस? तलवार नागवी करून तूं प्रहार तरी कोणावर करणार? तुझें डोकें ठिकाणावर नाहीं कीं काय?

अर्जुनः—कृष्णा! मी चांगला शुद्धीवर आहें. ' गांडीव धनुष्य दुसऱ्याला दे ' असें जो म्हणेल, त्याला मारावें असा माझा गांडीवप्राप्तीपासून गुप्त नियम आहे. धर्मराजा आतां तेंच बोलला. म्हणून प्रतिज्ञारक्षणासाठीं मी त्याचा शिरच्छेद करणार आहें, व मला तेंच विहित दिसतें. तुला हें योग्य वाटत नाहीं काय?

कृष्णः-शिव! शिव! अर्जुना! हें तुझ्याच तोंडून कां मी ऐकतों? धर्माचें तत्त्व तुला हेंच कां कळलें? कार्याकार्यव्यवस्था शास्त्रज्ञानाविना समजत नाहीं. वृद्धोपासनेशिवाय शास्त्रज्ञान होत नाहीं. चित्तशुद्धिव्यतिरिक्त वृद्धोपासना साधत नाहीं व सदसद्विचारबुद्धीवांचून चित्तशुद्धि होत नाहीं. या प्रणालिकेप्रमाणें पाहतां तुझी चित्तशुद्धिच झालेली नाहीं, असें

असतांही स्वतःस धर्मज्ञ समजून पाण्डित्य मात्र पुष्कळ करतोस! कार्याकार्याचा निश्चय करणें हें फार गूढ तत्त्व आहे. कित्येक वेळां सत्य बोलूनही अधर्म होत असतो, व असत्य बोलून धर्मरक्षण होतें. असत्य बोलावें, परन्तु हिंसा करूं नये, असें असतां तूं आपल्या भावाला ठार मारावयास प्रवृत्त झालास याला काय म्हणावें? बरें. तुझा भाऊ तरी कसा? तर सख्खा! तुजहून वडील! तशांत राजा! त्यांतही धर्मशास्त्रज्ञ! पुण्यश्लोक व सर्वमान्य! अशा प्रकारचा तुझा भाऊ मारिल्यानें तूं फक्त सत्याचें रक्षण करशील. पण इतर किती तरी पापें डोक्यावर घेशील? याचा कांहीं विचार केला आहेस काय बाबा! अशाला मारणें यांत तुझा भीरुपणा मात्र प्रकट होईल! जो युद्धविमुख आहे, जो मित्र आहे, जो कृताञ्जली आहे, जो भययुत आहे, जो रणांतून पळून जात आहे, जो विचारशक्तिहीन आहे व जो शरणागत आहे अशाला—किंवा यांपैकी एकालाही—शूर पुरुष मारीत नाहींत. या धर्मराजाच्या ठिकाणीं हें सर्व प्रस्तुत दिसत आहे. असें असतांना अशाला तूं मारून लोकांत सत्यप्रतिज्ञ म्हणवून घेणार काय? धर्माची गति फार सूक्ष्म आहे. मी जर आतां या वेळेला येथें नसतों, तर तूं कांहीं भलतेंच केलें असतेंस. अरे! लग्न, रति, प्राणक्षय, सर्वस्वविनाश आणि सज्जनकार्य या पांच प्रसंगीं जरूर पडल्यास अनृतही बोलावें. असत्य बोलूनही जर स्वधर्म होत असेल तर तसेंही बोलावें. तूं कसलें वेडयासारखें नसतेंच सत्य घेऊन बसला आहेस!

श्रीकृष्णाचें हें भाषण ऐकून अर्जुनास फारच गहिंवर आला. व आपण भरीं भरून एक भयंकर पातक करीत होतों, हें त्याच्या लक्षांत आलें. तो म्हणालाः—

अर्जुनः—कृष्णा ! जें खरें होतें तें मीं तुला सांगितलें. व तुझ्या उपदेशानें माझी चुकी माझ्या ध्यानांत आली. परंतु माझाही पण सिद्धीस गेला पाहिजे व राजा धर्मही जीवन्त असला पाहिजे, असा कांहीं तरी मार्ग तूंच सांग.

कृष्णः—आहे ! यालाही युक्ति आहे. धर्मराजा तुम्हांस अत्यंत मान्य आहे.व मान्यांचा अपमान करणें हें त्याचा वध करण्यासारखेंच आहे. पूज्यपूजाव्यतिक्रम करणें हें त्याच्या वधाहूनही त्याला अधिक भयंकर शासन आहे. अशा रीतीनें तुझें अनृतापासून रक्षण झाल्यावर तूं धर्मराजाचे पाय धर ! मग युद्धास जा ! व कर्णादिकांना मारून जय प्राप्त करून घे !

श्रीकृष्णाचें हें भाषण श्रवण करून अर्जुन धर्माचा अपमान करण्याच्या बुद्धीनें त्याला म्हणालाः—

अर्जुनः—राजा धर्मा ! विनाकारण माझी निन्दा करण्यास तूं कां प्रवृत्त होतोस ? जर रणांगणांत उत्साहानें तूं टिकाव धरितास व त्यांतून पळून न येतास तर हें तुझें बोलणें कांहीं तरी शोभलें असतें. ज्यानें शेंकडो हत्ती रणामध्यें मारून टाकिले, जो कल्पांत रुद्रासारखा रणांत संहार करितो, शस्त्रसम्पात सुरू झाला कीं, ज्याला वाहनादिकांचेंही भान राहत नाहीं, रिपुबल पाहून ज्याला तन्मथनाविषयीं हर्षवीची उचंबळूं लागतात, शत्रुसैन्याचा नाश करितेसमयीं ज्याला शर, भाते व धनुष्य यांचीही शुद्धि न राहतां जो नुसत्या हातानेंच त्याला झोडपीत सुटतो, ज्यानें आजच एका घटकेंत आठशें गज सहज लीलेनें मारून टाकिले,

व शंभरही धार्तराष्ट्रांना ठार मारण्याची ज्याची प्रतिज्ञा जवळ जवळ पूर्ण होत आली आहे, तो भीम माझी खुशाल निंदा करो. कारण तो खरोखरी मजपेक्षांही अधिक काम करीत आहे. असें असतांना तो चकार शब्दही बोलत नाहीं. पण तूं मात्र रणापासून एका कोशावर शिबिरांत द्रौपदीच्या मंचकावर बसून मारे मला दोष देत आहेस; याची तुला शरम वाटावयास पाहिजे. तुझ्यासाठीं आम्हीं सर्वस्व वेंचिलें. एकुलता एक अभिमन्यु बाळही, राजा धर्मा! तुझ्यासाठींच खर्ची पडला! असें असतांनाही तूं उलट मलाच बोल लावितोस!! धिक्कार असो तुला! तुला द्यूतप्रियाला राज्य काय होय! द्यूत खेळूं नकोस म्हणून तुला सहदेव वारंवार बजावीत असतांनाही तूं कुरुसभेंत माघार घेतली नाहींस व आमच्यासह आपल्या सुखांतही माता कालविलीस; निव्वळ तुझ्याचमुळें हा एवढा मोठा रणयज्ञ होऊन लक्षावधि वीरांचा क्षय होऊन वीरस्त्रिया विधवा झाल्या. इतकें करूनही, तुझें टोचणें चालू आहेच, याला काय म्हणावें? **जो भुजबळानें सम्पन्न असतो तोच खरा क्षत्रिय होय, वाग्बलसम्पन्न असतो तो ब्राह्मण होय. तूं खरोखरी ब्राह्मण आहेस. क्षत्रियाचें कर्म तुला काय होय?**

इत्यादि प्रकारची मनसोक्त निंदा केल्यावर अर्जुन क्षणभर गप बसला. व पुनः त्यानें आपली तरवार उपसली. तेव्हां कृष्ण घाबरून म्हणाले.

कृष्णः—बाबा! अद्याप तुझा क्रोध शान्त होत नाहीं काय?

अर्जुनः—कृष्णा! आतां मला माझाच राग आला आहे. गुरुजनांची निंदा करून या जिभेनें या तोंडांत राहावें किंबहुना

या प्राणांनीं या हृदयांत वास करावा, हें मुळींच योग्य नाहीं. म्हणून आतां मी माझेंच मस्तक धडापासून वेगळें करणार!

कृष्ण:—पहा! तुला धर्माचें तत्त्व समजलें नाहीं, असें जें मीं पूर्वी म्हटलें; तें खरें आहे, अशी तुझीहि आतां खातरी होईल. पण काय रे! नुसती निंदा जर तुला सहन होत नाहीं तर तूं धर्मराजाचा वध केल्यानंतर काय केलें असतेंस! आतां तुला गुरुनिंदापातकशमनार्थ जर स्ववध एवढाच उपाय दिसत असला तर त्यालाही एक युक्ति सांगतों. **ज्याप्रमाणें परनिंदेनें परवध होतो त्याचप्रमाणें आत्मस्तवनानें आत्मवध होत असतो, असें शास्त्र आहे.** म्हणून तूं आतां आत्मप्रौढी गा! म्हणजे तुला स्ववधासारखीच शिक्षा होईल.

हें कृष्णाचें पुनरपि युक्तिवादाचें भाषण ऐकून पार्थ आपले गुण आपणच वर्णूं लागला.

पार्थः— राजा! या पृथ्वीतलावर मीच एकटा काय तो धनुर्धर आहें. जर मला तूं आज्ञा करशील तर एक क्षणही जाऊं न देतां या चराचर सृष्टीचा तेव्हांच नाश करून टाकीन. दिग्विजय मींच केला, तुझा राजसूय यज्ञ मजमुळेंच शेवटास गेला, खाण्डववन अग्नीला मींच दिलें व मयासुरानें मजमुळेंच अप्रतिम सभा तयार करून तुला दिली होती. पण करून लढणाऱ्या संशप्तक नांवाच्या वीरांना, मीच एकट्यानें खपविलें व अकरा अक्षौहिणी सेनेपैकीं अर्धी सेना मींच एकट्यानें रणभूमीवर कायमची निजवून ठेविली. अरे! अकराही अक्षौहिणी मींच मारिल्या असत्या, परंतु भीमादिकांचेंही कांहीं यश व्हावें, म्हणून हात आंवरून लढलों. राजा! कर्णाची कथा

काय? आज त्याला मारून तुझ्या हृदयांत तेरा वर्षे सलत असलेलें शल्य काढून टाकिल्याशिवाय मी कवच उतरणार नाहीं. सर्व पाण्डवांची व या गाण्डीव धनुष्याची शपथ घेऊन सांगतों कीं, आज कर्णाला मारिल्याशिवाय मी रणांतून परत फिरणार नाहीं. राजा! तुला त्यानें फार छळिलें आहे. व भीमालाही बोलूं नये तें बोलला आहे. या सर्वांचें उसनें मी आज फेडून टाकीन. कृष्णा! रथ आण! राजा! कर्णाला मारण्यास जाण्याविषयीं मला अनुज्ञा दे, व आशीर्वादही दे! हा माझा देह तुझ्या चरणीं मीं वाहिला आहे. हल्लीं भीम समरांत एकटाच लढत आहे. त्याला जाऊन सोडवूं दे!

याप्रमाणें श्रीकृष्णानें अर्जुनास चांगलें तयार करून मग सोत्साह असा रणभूमीवर आणिलें. येतां येतां पुनः अर्जुनाला कर्णवधाची अशक्यता वाटून तो भग्नोत्साह होऊं लागला. जसजसा संग्राम जवळ जवळ दिसूं लागला तसतसा अर्जुन अन्तःकरणांत फार भिऊं लागला; त्याच्या अंगाला घाम सुटला, तोंड कोरडें पडूं लागलें व अंगांत कांपरेंही भरलें. त्रिलोकसाक्षी भगवान् श्रीकृष्णांनीं हें ओळखिलें व पुनः त्याला धैर्य दिलें. याच्या पूर्व गुणांचें व पराक्रमांचें अतिशयोक्तिपूर्ण असें वर्णन केलें. याप्रमाणें त्याला धीर देऊन श्रीकृष्णांनीं त्याचा रथ रणांगणावर कर्णासमोर आणून उभा करण्यास सपाट्यानें चालविला.

१

# वधपर्व.

**अर्जुनोद्वेग.**

१. अर्जुन शिबिरांत गुंतला असतांना इकडे भीमानें सैन्यांत बराच पराक्रम केला, व कौरवसैन्याच्या कांहीं भागास पळावयास लाविलें. तें पाहून कर्ण त्यावर चालून गेला. त्यावेळीं कर्णावर पाण्डवपक्षैकपाती सात्यक्यादि महावीर एकदम चढाई करून गेले व मोठा घनघोर रणसंग्राम झाला. कर्णाचा पराक्रम सर्वांनाच दुःसह झाला. एकही वीर पुढें जाण्यास धजेना. सर्वत्र हाहाकार उडून गेला. भीमही घाबरून गेला. इतक्यांत अर्जुन येऊन पोंचला; व आपल्या सैन्याची कर्णकृत दुर्दशा पाहून फार खिन्न होऊन श्रीकृष्णास म्हणाला, "देवा! एकदम मला कर्णाजवळ ने. नाहीं तर भीमाची दशा कांहीं बरी दिसत नाहीं. ते पहा! भीमासह सर्व पांचाळ पुढें पळत असून त्यांच्या मागें दुर्योधन कसा लागला आहे! त्याचें रक्षण कृतवर्मा, अश्वत्थामा आणि आमचे गुरु कृपाचार्य कसें झटून करीत आहेत तेंही पहा! देवा! आम्ही इतक्या चांगल्या रीतीनें वागत असूनही त्यांची दुर्योधनावरच ममता असावी ना! अरे! आमचा मामा मोठा शूर व सत्यवचनी परन्तु तोही ऐनप्रसंगीं आमच्या शत्रूसच सहाय झाला. हें आमचेंच दुर्भाग्य म्हणावयाचें! आतां मुळींच वेळ न लावितां मला कर्णाजवळ ने!" तेव्हां कृष्णानेंही रथ कर्णाकडेस वळविला. हें पाहून शल्य कर्णाला म्हणाला, "कर्णा! सावध हो! अरे हा अर्जुन आला! तूं धर्माचा पराभव केलास, भीमाची

दुर्दशा उडविलीस, नकुळाला धिक्कारिलेंस व सहदेवाची रग जिरविलीस. ह्या सर्वांचें उसनें फेडण्यासाठीं त्यांचा हा कैवारी अर्जुन आला! याच्या पुढें कोणीही टिकाव धरीत नाहीं व तो आतां एकटाच दिसतो, तर कर्णा! मला आज्ञा दे, म्हणजे अशा वेळीं मी तुला त्यासमोर नेऊन उभा करितों. अर्जुन हा फार मोठा धनुर्धर आहे, व तूंही कांहीं सामान्य वीर नाहींस. दिग्विजयप्रसङ्गीं जें तेज तुझ्यांत होतें तेंच आतां तुला प्राप्त होवो!" कर्ण म्हणाला, "शल्या तूं खरेंच सांगितलेंस. आतां तूं मात्र धैर्य सोडूं नकोस. जन्मापासून ज्या दिवसाची मी मोठ्या उत्सुकतेनें व आतुरतेनें वाट पाहत होतों, तो दिवस माझ्या अनन्त जन्मांच्या पुण्याईनें आज मला प्राप्त झाला आहे. जो अद्वितीय वीर आहे, जो प्रत्यक्ष शंकरासही युद्धांत मान्य झालेला आहे, व ज्यानें परमेश्वराचें सख्य सम्पादन केलें आहे, त्या अर्जुनाशीं आज माझें द्वैरथ युद्ध होणार हें निजभाग्य मीं कोठवर वर्णावें? पाशुपतास्त्र मानवांना दुर्लभ आहे. परन्तु इन्द्रादिदेवतांनीं ज्याला आपलीं अस्त्रें शिकविलीं त्या अर्जुनाशीं आज माझें द्वन्द्व होणार हें केवढें महत् भाग्य? शल्या! हे कृष्णार्जुन, पुराण ऋषी नारायण आणि नर यांचे प्रत्यक्ष अवतार आहेत. देवकार्यासाठींच यांचा अवतार झालेला आहे. असल्या कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् वीरांशीं मी आज निर्भय चित्तानें व परमानन्दयुक्त अन्तःकरणानें धर्मयुद्ध करीन. सद्गुरु परशुरामाच्या प्रसादानें व त्यांनीं शिकविलेल्या विद्येच्या प्रभावानें या नरनारायणांनाही थक्क करून सोडीन. भीष्मद्रोणांपेक्षांही अधिक लोकोत्तर असा पराक्रम आज मी करीन! इतकेंच नव्हे, परन्तु या उभयतां कृष्णांनाही आज युद्धांत घाबरवून टाकीन. तूं मात्र निर्भय ऐस!" इतकें शल्यास सांगून दुर्यो-

धन, कृपाचार्य, कृतवर्मा आणि अश्वत्थामा यांना त्यानें अर्जुनावर पाठविलें. आणि त्यांच्या रक्षणार्थ आपण सज्ज होऊन अर्जुनरक्षक वीरांशीं युद्ध करूं लागला. त्यानें सर्व पांचाळ वीरांना पळविलें, शतानीक व सुतसोम यांचीं धनुष्यें मोडून टाकिलीं, कैकय व त्याचा पुत्र विशोक, यांनांही त्यानें ठार मारिलें आणि सात्यकि, शिखंडि व धृष्टद्युम्न यांचीही त्यानें त्रेधा उडवून दिली. तेव्हां अर्जुन पुनः कृष्णास म्हणाला, "कृष्णा! सर्व पांचाळांना हा कर्ण आज बहुतेक लयास नेऊन ही पृथ्वी अपांचाळ करील, असे मला वाटतें. म्हणून तूं अगोदर तिकडेस रथ चालीव!" कृष्णानेंही रथ तिकडेसच हांकिला.

**कर्णपराक्रम.**

२. अर्जुनाचा रथ समरांगणांत मध्यवर्ती आल्यावर कर्णाचा मुलगा वृषसेन त्यावर चालून गेला. यापूर्वी वृषसेनानें अनेक रथातिरथांस विरथ, विशस्त्र व विरुत्साह करून रणांतून पिटाळून लाविलेलें होतें. कृष्णार्जुनावरही शस्त्रप्रहार करण्यास त्यानें मुळींच मागें पुढें पाहिलें नाहीं. वृषसेन किती झालें तरी पोरच होता. त्यानें शक्य तेवढा पराक्रम केला. परन्तु या युद्धांत अर्जुनाच्या हातून त्याला मृत्यु आला. वृषसेनाचा पराक्रम पाहून वस्तुतः अर्जुनानें त्याची पाठ थोपटावयास हवी होती; परन्तु क्रोधान्ध अर्जुन हें विसरला असें दिसतें, किंवा त्याच्या मनाचा तितका मोठेपणा नसेल! कांहींही असो. अर्जुनाच्या तोंडून चार प्रशंसापर उद्गार निघाले नाहींत हें मात्र कांहीं खोटें नाहीं. वृषसेन रणांत पडलेला पाहतांच कर्ण फारच खवळला व एकदम अर्जुनावर धांवून आला. त्याला पाहून कृष्ण अर्जुनास म्हणतात, " अर्जुना! आतां मात्र

सांभाळ ! हा कर्ण स्वापत्यवधानें फारच क्रुद्ध झालेला आहे. पांचाळ योद्धे गलितधैर्य होऊन पळूं लागले आहेत. त्याच्या शरपात भूमीवर तुझ्याशिवाय एकही योद्धा जीवन्त राहणार नाहीं. तूं फारच पराक्रमी असून सुरांसुरांसही तुझ्या पराक्रमाचा दर्प सहन होत नाहीं. श्रीशंकराच्या प्रसादानें कर्णाला मारून ही भूमि धर्मराजास तुझ्याशिवाय आज दुसरा कोण प्राप्त करून देईल ?" अर्जुन म्हणाला, "कृष्णा ! तुझ्या प्रसादानें व कृपेनें आज मी कर्णास निश्चयानें ठार मारीन. आज कर्ण किंवा अर्जुन या दोघांपैकीं एक खातरीनें ठार मरणार आहे ! तुझें मन व्यग्र होऊं देऊं नकोस ! रणामध्यें जय किंवा मृत्यु यासाठींच आम्हां क्षत्रियांचे जन्म होत. माझा रथ कर्णासमोर ने !" याप्रमाणें उभयतांचें भाषण होऊन शल्यकृष्णांनीं कर्णार्जुनांचे रथ समोरासमोर आणून उभे केले. दोघांचा उत्साह, दोघांचें तेज, दोघांची विद्या, दोघांचें शिक्षण, दोघांचें बळ, दोघांचें धैर्य, दोघांचें बळ, दोघांचें शौर्य आणि दोघांचा प्रभाव ( व प्रभव ) अगदीं तुल्य होता. ज्याला पाहावें तोच या संग्रामांत विजयश्रीपति होईल असें वाटत होतें. असो. कर्णार्जुनांचा सायन्त रणसंग्राम कांहीं मी आतां वर्णन करीत नाहीं. अग्न्यस्त्र, मेघास्त्र, वातास्त्र, पर्वतास्त्र, ऐन्द्रास्त्र, व्यालास्त्र, गरुडास्त्र, इत्यादि पौराणिक अस्त्रसम्पत्ति प्रसिद्धच आहे. तिचा यथेच्छ उपयोग उभयतांनीं केला. कर्णाचा पराक्रम क्षणोक्षणीं अर्जुनास उग्रतर व म्हणून असह्य वाटत होता. श्रीकृष्ण त्याला वारंवार धीर देत होतेच. कर्णाचें लाघव, शरसन्धान, प्रहारचापल्य इत्यादि गोष्टी पाहून प्रेक्षकजनही थक्क होऊन गेले. व पार्थापेक्षां कर्ण खरोखरीच श्रेष्ठ आहे अशी त्यांची खातरी झाली.

पुढें कर्णानें एक भयंकर जलाल, बांकदार व फार दिवसांपासून सुवर्णाच्या भात्यांत, चंदनाच्या चूर्णांत नित्यपूजा करून ठविलेला, शत्रुघातक, सर्पमुख, उग्र, प्रज्वलित व निशित असा बाण धनुष्यावर योजिला. त्यावेळीं दिशा व उपदिशा धुंद झाल्या, शेंकडो उल्का पतन पावल्या व सर्व लोकपालामध्यें हाहाकार उडून गेला. या भयंकर बाणामध्यें योगबलानें अश्वसेन नाग प्रविष्ट झाला होता; परंतु हें कर्णास मुळींच ठाऊक नव्हतें. खांडवदाहसमयीं अर्जुनानें अश्वसेनाच्या मातेस मारिल्यानें, तो सूड उगविण्याचे हेतूनें, तो नाग कर्णाचे भात्यांत शिरला होता. श्रीकृष्णांनीं हें जाणूनच तो बाण मोठ्या युक्तीनें—म्हणजे अर्जुनाच्या रथाचे घोडे खालीं बसवून—चुकविला, परंतु या बाणानें अर्जुनाच्या रत्नखचित मुकुटाचा मात्र नाश झाला. हा किरीट अर्जुनास इन्द्राकडून मिळाला होता. असो. याप्रमाणें हें व्यालास्त्र फुकट गेलें, तेंव्हां तो नाग परत येऊन कर्णाच्या भात्यांत शिरूं लागला. कर्णानें हें पाहून ‘ तूं कोण ? ’ असें त्यास विचारिलें. त्यानें वैराची त्रोटक हकीकत सांगितली, व पुनः सन्धान करण्यास फारच नम्रतेनें विनंति केली. ती ऐकून कर्ण हंसून म्हणाला, “ हे नागा ! वाटेल तेवढें संकट प्राप्त झालें तरी हा कर्ण एका बाणाचें दोनदां सन्धान कधींच करीत नाहीं व करणारही नाहीं. एका अर्जुनाची कथा काय ? असें शेंकडो अर्जुन रणामध्यें मारूनही हा कर्ण भागणार नाहीं. आजपर्यंत अर्जुनाशीं जें वैर सम्पादन केलें, तें कांहीं इतरांच्या बळावर सम्पादन केलें नाहीं. हे माझे बाहु स्वतःच्या बळावरच विजयी होण्यास समर्थ आहेत, इतरांच्या बळानें ते विजयार्थी होऊं इच्छीत नाहींत. म्हणून

तूं येथून निघून जा." असो. याप्रमाणें सर्वलोकविस्मयकर असा समरचमत्कार होत असतां, एकदम कर्णास ब्रह्मास्त्राची विस्मृति झाली, व पृथ्वीनेंही रथचक्र ग्रासिलें. हें पाहातांच आपला वधसमय प्राप्त झाला असें कर्णानें ताडिलें, व आजपर्यन्त आपण सद्धर्मानें चाललों असूनही त्याचा आपणांस अशा वेळीं कांहींच उपयोग झाला नाहीं, हें अवलोकन करून तर त्याला फारच वाईट वाटलें, आणि सन्तापही आला. तो तसाच आवेशानें अर्जुनाशीं युद्ध करूं लागला. कर्णाचा मरणकाल समीप आला हें कृष्णासही समजलें. कर्ण शेवटीं शेवटीं तर फारच उग्रतेनें शरसन्धान करूं लागला. यावेळीं त्याचें आपल्या चापगुणझणत्कारानें मदमत्त व क्रोधोधत्त अशा हत्तींचीं मस्तकेंही झणझणावून सोडिलीं. फाल्गुन पुनः घाबरला. केशवानें पुनः धीर दिला. इतक्यांत कर्ण **रथचक्रउद्धरणासाठीं** खालीं उतरून प्रयत्न करूं लागला. रथचक्र कर्णानें किती बळानें उचलिलें याची कल्पना येण्यास महाभारतांतील पुढील श्लोक खालीं देतों:—

**सप्तद्वीपा वसुमती सशैलवनकानना ।**
**गीर्णचक्रा समुक्षिप्ता कर्णेन चतुरङ्गुलम् ॥**

" जिनें रथचक्र धरिलें आहे अशी सशैलवनकानना व सप्तद्वीपा वसुमती कर्णानें चार बोटें वर उचलली." ( म्हणजे तेवढी जागा उकरबून चार बोटें वर आली. )

**कर्णवध.**

३. अशा रीतीनें कर्ण **न्यस्तायुध** असून रथचक्र उद्धरीत असतां श्रीकृष्णानें अर्जुनास सांगितलें कीं, अशा **व्यसनांत** जोंपर्यन्त कर्ण आहे तोंपर्यन्तच तूं यावर प्रहार करून यास ठार कर. यानें शस्त्रधारण केल्यावर मग मात्र हा कांहीं ऐकणार नाहीं. अर्जुनानें कृष्णाचा हा उपदेश ग्रहण करून तो कर्णास मारण्यास सिद्ध

झाला. अशा रीतीनें स्ववधोद्यत अर्जुनाला पाहून कर्ण म्हणाला, " अर्जुना ! तूं रथी आहेस व मी पदाति आहें, तूं सायुध आहेस व मी अशस्त्र आहें. अशा स्थितींत तूं माझ्याशीं युद्ध करावेंस हा युद्धधर्म नव्हे. मी तुला भ्यालों आहें किंवा मरणाला तरी मी भीत आहें अशांतला मुळींच भाग नाहीं. क्षणभर जर तूं दम धरिलास तर रथोद्धारणानन्तर पुनरपि त्यांत बसून हा कर्ण तुझी रणश्रद्धा पुरवील. यासाठीं कृष्णाचा उपदेश बाजूला ठेवून धर्माप्रमाणें कर्तव्य कर." हें कर्णाचें भाषण ऐकून कृष्ण म्हणतात-" कर्णा ! बरा रे यावेळीं तुला धर्म स्मरला ! जेव्हां तूं, दुःशासन, शकुनि व दुर्योधन हे एकमति होऊन कपटद्यूत खेळलांत, द्रौपदीला सभेंत नेलीत, भीमाला विष चारिलेंत, पाण्डवांना जतुगृहीं दग्ध केलेंत, द्रौपदीला भरसभेंत नग्न करण्याचा प्रयत्न केलात व तिला बोलूं नये तें बोललांत, तेव्हां तुझा धर्म कोठें गेला होता ? तुम्हीं सहा महारथ्यांनीं एकटया अभिमन्यूला मारिलेंत,तेव्हां तुझा धर्म काय झाला होता ? आजपर्यन्त तुम्हीं ज्या धर्माचें रक्षण केलेंत, तोच तुमचा आतां काळ झाला आहे. आतां दुसऱ्यास उपदेश करण्यांत काय अर्थ आहे ? अर्जुना ! पाहतोस काय ? उडोव या कर्णाचें मस्तक." अशी आज्ञा होतांच एका तेजस्वी बाणानें अर्जुनानें कर्णाचें मस्तक तो निशःस्त्र व विरथ असतां धडापासून वेगळें केलें. कर्णवधानन्तर कौरवसेनेचा पुष्कळच नाश झाला. दुर्योधनानें कर्णाबद्दल फारच शोक केला. कर्णवधाची वार्ता प्रथमतः धृतराष्ट्रास तर खोटीच वाटली. परन्तु धर्मासही ती खरी वाटेना ! धर्मराजा स्वतः रणभूमीवर कर्णाच्या प्रेताजवळ आला व त्यानें तें प्रेत पाहून स्वतःची खातरी करून घेतली.कर्णवधानें धर्मासही फारसा आनन्द झाल्याचें दिसलें नाहीं.

# १०

# शोकपर्व.

**धृतराष्ट्रकृत शोक.**

१. महारथी कर्णाचा वध झाल्यावर सर्व कौरवसेना सैरावरा पळूं लागली. धृतराष्ट्रास सञ्जयाकडून कर्णवधवार्ता समजतांच एकदम मूर्च्छा आली. शीतोपचारांनीं जागा झाल्यावर तो बोलूं लागला, " सञ्जया ! कर्णवध क्षणोक्षणीं मला खोटा वाटतो. तूं सांगतोस म्हणूनच मी मानितों, एवढेंच ! आज कर्ण मेला नसून माझा पुत्र दुर्योधनच मरण पावला हें खास ! अरे ! जो सिंहासारखा पराक्रमी, सूर्यासारखा तेजस्वी व परशुरामासारखा दृढनिश्चयी तो कर्ण कसा रे मारिला गेला ? ज्यानें दिग्विजयप्रसङ्गीं यच्चयावत् राजे जिंकून त्यांजपासून करभार आणिला, उभयतां कृष्ण मारण्याची व सर्व भूमी दुर्योधनास देण्याची त्याची प्रतिज्ञा होती. मृत्यूलाही जो कःपदार्थ समजत होता, तो पुरुषशार्दूल कर्ण कसा रे मेला ! जो अनवरत दिव्यास्त्रांचा प्रयोग करीत असे, जो इन्द्रासही अक्षय कवच-कुण्डलें दान म्हणून देता झाला, ज्यानें घटोत्कचासारख्या अद्वितीय वीराग्रणीला रणांत लोळविलें तोच कर्ण दुर्योधनाला सोडून कसा रे गेला ! जो ब्रह्मास्त्रज्ञतेमुळें भीष्मद्रोणांशीं सतत स्पर्धा करीत असे; युद्धाच्या तेराव्या दिवशीं अभिमन्यूसमोर द्रोणादि विमुख झालेले पाहतांच ज्यानें अभिमन्यूचें धनुष्य तोडून टाकिलें; भीमासारख्या अतिबलाढ्य वीराच्या गळ्यांत धनुष्य अडकवून त्याचाही ज्यानें अत्यन्त उपहास केला; अर्जुनाशिवाय सर्व पाण्डव ज्यानें लीलेनें जिंकून

कैद करून सोडून दिले; तो पराक्रमी वीरमणि कर्ण कसा रे यमाचा पाहुणा झाला ! इतक्या दिवसपर्यन्त ज्याचें भय धरून अर्जुन द्वैरथ युद्ध त्याजशीं करीत नव्हता, व सामन्याच्या ऐन प्रसङ्गीं कांहीं निमित्तानें जो अर्जुन रणांतून ज्याच्या समक्ष पळून गेला, त्याच अर्जुनानें या कर्णाचा वध केला, हें मला खरें तरी कसें वाटावें ? भीष्मद्रोणकर्णासारख्या वीरांच्या मृत्यूला खरो-खरी आमचेंच दैव करणीभूत झालें. संजया बोल ! बोल ! लढाईच्या ऐनप्रसंगीं कर्णाचें धनुष्य मोडिलें ? कीं, भात्यांतून बाण ओढून काढीत असतां त्याला सर्पदंश झाला कीं, झालें तरी काय ? 'पार्थाचा वध करीपर्यन्त मी पादधावन करणार नाहीं' अशी ज्याची घोर प्रतिज्ञा होती, तेरा वर्षेपर्यन्त ज्याच्या भीतीनें धर्मराजाला झोंप आली नाहीं, पाण्डवांच्या समक्ष भरसभेंत जो द्रौपदीला 'दासांची भार्या,' 'पतिरहिता' इत्यादि रुक्ष वाणी बोलण्यास मुळींच भ्याला नाहीं, व प्रत्यक्ष पाण्डवांनाही 'षंढ' म्हणण्यास जो यत्किंचित्‌ही कचरला नाहीं, तो कर्ण खरोखरीच मेला काय रे ? यादव-पाण्डव-कौरव तर काय ? पण कृष्णासही जो लेखीत नव्हता, ज्याच्या मतानेंच शिष्टाईच्या प्रसंगीं आम्हीं प्रत्यक्ष भगवान् कृष्णाचीही अव्हेर केला, जो इंद्रासही शौर्यांत भीक घालीत नव्हता, तो कर्ण रणांत पडला हें तूं खरें सांगितलेंस काय रे !" इत्यादि अनेक प्रकारांनीं धृतराष्ट्रानें फारच विलाप केला.

**गांधारीकृत शोक.**

२. सर्व युद्ध संपल्यावर युद्धस्थान पाहण्यास श्रीकृष्णाबरोबर गान्धारी गेली. तिनें कर्णाचें शव पाहून फारच शोक केला व म्हणाली, "हा येथें महारथ कर्ण पडलेला आहे. कृष्णा ! याचा प्रतापाग्नि पार्थपराक्रमरूपी उदकानें विझून गेला आहे.

अनेक रथी व अतिरथी यांस ठार मारून यानें जमिनीवर कायमचें शयन केलें आहे. कृष्णा! याचें सर्व अंग रक्तानें भरून गेलें आहे, तें पहा! अरे हा फार क्रोधी, द्वेषी व बलाढ्य वीर अर्जुनाच्या हातून मरून कीं रे गेला! माझ्या मुलांनीं याला पुढें करून पांडवांना मोठी लढाई दिली. तोच कर्ण आज हा मरून पडलेला आहे काय रे! श्रीकृष्णा! याच्या स्त्रिया पहा! याच्या प्रेताभोंवतीं जमून रडत बसल्या आहेत. कृष्णा! कृष्णा! ज्याच्या धास्तीनें युधिष्टिर सर्वदा चिंतामग्न असे, जो रणांगणांत शत्रूला कधींही पाठ दाखवीत नसे, उदयकालच्या सूर्याप्रमाणें जो तेजस्वी असे, जो हिमालयपर्वताप्रमाणें संकटकालीं स्थिर असे, व मेरुपर्वताप्रमाणें ज्याचें धैर्य अचल असे, तो वीर कर्ण वातभग्न वृक्षाप्रमाणें जमिनीवर मरून पडला ना? हाय! हाय! कर्णा! परशुरामाचा शापच तुला भोंवला काय? ऐनप्रसंगीं पृथ्वीनें तुझें रथचक्र कसें रे गिळलें? कर्णा! ही तुझी माता राधा शोकसंतप्त होऊन बेशुद्ध पडली आहे. एक वेळ तरी आम्हांशीं बोल! कर्णा! तुझा तो गर्व आणि कौरवरक्षणाची प्रतिज्ञा आज कोठें रे गेली? ज्या तुजकडे, तूं जीवन्त असतांना प्रत्यक्ष यमही पाहण्यास समर्थ नव्हता, किंवा तुझ्या आज्ञेशिवाय तुझ्या शरीराला स्पर्श करण्याची वायूचीही प्राज्ञा नसे, त्या तुझ्या शरीराचे लचके तोडून हे गृध्रपक्षी निर्भयपणें खात आहेत. कृष्णा जरी याचें शरीर असें विद्रूप झालें आहे तरीही याच्या शरीरावरील तेज मुळींच कमी झालेलें नाहीं. कृष्णा पुत्रवधानें दीन झालेली राधा कर्णाचें मुख पुनः पुनः हुंगून सारखा विलाप करीत आहे. पुत्रवधापेक्षांही मला कर्णवधानें

अधिक दुःख होत आहे." या परीनें गान्धारीनें परोपरीनें शोक केला,

२. कर्ण हा असा तेजस्वी, शूर, व देवपुत्रासमान असून

**धर्मपृच्छा.**

त्याला असली हीन जातीची संगति जन्मापासून कां असावी? असें कर्णाच्या वेळींही पुष्कळांना वाटत असे. युधिष्ठिरासही या गोष्टीचें मोठें गूढ पडलें होतें. शान्तिपर्वाच्या आरंभीं भगवान् नारदमुनि धर्मास भेटण्यास आल्याचा उल्लेख आहे. नारदानें धर्मास विचारलें, "राजा धर्मा! श्रीकृष्णाच्या अनुग्रहानें व स्वतःच्या बाहुवीर्यानें त्या लोकभयङ्कर संग्रामांत सर्व दुष्टांचा निःपात करून तूं जो जय मिळविलास त्यायोगें आतां तूं तुष्ट आहेस ना?" धर्मराजानें उत्तर दिलें, "महाराज! श्रीकृष्णाच्या प्रसादानें, ब्राह्मणांच्या आशीर्वादानें व भीमार्जुनांच्या सामर्थ्यानें मला जय मिळाला, ही गोष्ट जरी खरी आहे, तरीही लोभाच्या प्रेरणेनें आपल्या ज्ञातीचा हा भयंकर संहार करून ज्या युद्धांत सौभद्र-द्रौपदेयासारखीं मोहोरीं विरेस घातलीं, त्या युद्धांत जय प्राप्त झाला तरीही त्यामुळें माझ्या अन्तःकरणाला दुःखाच्या भयंकर वेदना होत आहेत. याशिवाय, नागायुतबळ, अप्रतिरथ, सुव्रत, दयाळू, दाता, भीमपराक्रमी, असहिष्णु व त्वरेनें अस्त्रें सोडणारा असा जो वैकर्तन कर्ण, तो आमचा ज्येष्ठ भ्राता, हें न समजून आम्हीं त्यास मारिलें. व याला कारण कुन्तीचें तत्संबंधीचें मौन हें होय, असें आम्हांस कर्णादींच्या उत्तरकार्यप्रसंगीं समजलें असून मला हा झालेला जय अपजयाकार भासत आहे. आमच्या मातेनें कर्णास आमचें नातें कळविलें होतें व आम्हांस येऊन मिळण्यासही विनविलें होतें. तेव्हां त्या

महात्म्यानें दुर्योधनाचा त्याग करण्याचें स्पष्ट नाकारिलें पण अर्जुनाशिवाय इतर कोणत्याही कुन्तीपुत्राचा मी वध करणार नाहीं, असें त्यानें आमच्या मातेस युद्धापूर्वीच वचन दिलें होतें, व तें त्यानें अक्षरशः पाळिलें. कर्ण आमचा बन्धु आहे, हें मला माहीत नव्हतें, भीमाला ठाऊक नव्हतें, अर्जुनास कळलें नव्हतें, नकुळास समजलें नव्हतें व सहदेवास कोणींही सांगितलें नव्हतें. त्यामुळें आम्हीं राज्यलोभानें त्या महात्म्याचा वध केला. खरोखरी अर्जुन व कर्ण या उभयतांचें साहाय्य मिळतें तर मी युद्धांत इन्द्राचाही पराजय केला असता. द्यूतांत हरल्यावर कौरवांनीं सभेंत जो आमचा अपमान केला, त्यायोगें अंतः-करणांत उत्पन्न झालेला क्रोधाग्नि कुन्तीच्या दर्शनानेंच शमत असे, तसाच तो कर्णाचे पाय पाहूनही शमत असे. म्हणजे कर्णाच्या पायांचा घाट अगदीं हुबेहूब कुन्तीच्या पायांसारखा होता. अर्थात् कर्णाचे पाय पाहतांच हे पृथेचेच पाय आहेत असा मला भास होत असे. कर्णाच्या आणि कुन्तीच्या पायांत इतकें सादृश्य कां असावें ? या सादृश्यहेतूचा हृदयांत मीं तेव्हांपासून पुष्कळ विचार करून शोध केला; परन्तु माझ्या दुर्दैवानें, मला मन्दबुद्धीला, त्याचा तेव्हां, व पुढें केव्हां सुद्धां, उलगडा झाला नाहीं याचें कारण काय असावें हें आपण कृपा करून मला सांगा." हें ऐकून नारद म्हणाले,"या पृथ्वीवर क्षत्रिय फार उन्मत्त झालेले पाहून त्यांना नाहींसे करण्याच्या हेतूनेंच हा कन्यागर्भ देवांनीं निर्माण केला. व त्यांच्याच संकल्पानें हा महातेजा सूतत्व पावला आणि यानें पुढें वैराग्नि पेटविला. असा वैराग्नि पेटविण्यांत देवांचा हेतु एवढाच होता कीं, सर्व क्षत्रियांनीं रणामध्यें शस्त्रपूत होऊन उत्तम लोकप्राप्ति करून घ्यावी.तुझी सुबुद्धि, भीमाचें बळ,

अर्जुनाचें लाघव, व नकुलसहदेवांचा विनय, हे तुमचे सद्गुण पाहून याच्या अन्तःकरणांत लहानपणापासूनच तुमचेविषयीं असूया उत्पन्न झाली! व तेव्हांपासून मनांत हा फार खिन्न असे. पुढें कृष्णार्जुनांचें अत्यन्त सख्य तर त्याच्या तळव्याची आग मस्तकीं जाण्यास फारच कारणीभूत झालें. आणि तेव्हांपासून तो तुमचा द्वेष करूं लागला. जो क्षत्रिय अभिमुखशस्त्राघातानें रणांत मृत्यु पावला त्याला श्रेष्ठ लोक प्राप्त होतात. व म्हणूनच कदापि तो शोच्य नव्हे; किंबहुना क्षत्रिय आपला देह अशा रीतीनें त्याला मृत्यु येण्यासाठींच जतन करीत असतात. ही गोष्ट लक्ष्यांत आणून तूं शोकाचा त्याग कर. ''

**कर्णाचे पुत्र.**

४. कर्णास चार पुत्र होते. पैकीं वडील पुत्र वृषसेन हा युद्धांत अर्जुनाचे हातून मारला गेला. बाकीचे तिघे लहान होते. त्यांचें पालनपोषण अर्थातच धर्मराजानें केलें. या तीन मुलांपैकीं एक मुलगा वृषकेतु या नांवाचा होता. तो पांडवांच्या अश्वमेधसमयीं त्यांना अत्यन्त उपयोगी पडल्याचें वर्णन जैमिनिअश्वमेधांत आहे. बभ्रुवाहनाशीं लढत असतांना गांडीवचापही जेव्हां बंद राहिलें तेव्हां या वृषकेतूनेंच बभ्रुवाहनाशीं निकराचा सामना केला होता.

**कर्णाचें पुनर्दर्शन.**

५. भारती युद्धानंतर धृतराष्ट्र, गांधारी, कुंती व सर्व कौरवस्त्रिया हीं माणसें पंधरा वर्षें धर्मराजाजवळ होतीं. व पुढें तीन वर्षें तपोवनांत राहिलीं होतीं. तपोवनांत असतांना एक वर्षानें, म्हणजे युद्धानन्तर सोळा वर्षांनीं, युद्धांत पतन पावलेल्या भीष्मद्रोणादि कर्मानुरूपलोकस्थित अशा सर्व वीरांना एक रात्रिपर्यंत

येथें राहण्यास योगसामर्थ्यानें त्या त्या लोकांतून आकर्षण करून व्यास महर्षींनीं आणिलें होतें. ते वेळीं आपणांस कर्णास भेटण्याची अत्यन्त उत्कंठा झाली आहे असें कुंतीनें फारच काकुळतीनें व्यासास विनविलेलें आहे. ही हकीकत आश्रमवासी पर्वांत आहे. सर्व वीरांबरोबर कर्णही एक रात्रिभर राहण्यास आला होता. तो गंगेंतून निघतांच जणूं सूर्यच बाहेर निघाला कीं काय, असें लोकांस क्षणभर वाटलें.

**किरकोळ.** ६. स्वर्गारोहणपर्वांत इतर पांडवांबरोबर, कर्णही नरकांत पडल्याचें लिहिलें आहे, परन्तु तो प्रक्षेप असावा असें स्पष्ट दिसतें. कारण युद्धांत मृत्यु आलेल्याला अक्षय लोकच मिळाला पाहिजे, असें श्रुतिवचन आहे. पाण्डवांना कांहीं युद्धांत मरण आलें नव्हतें. तेव्हां त्यांना त्यांच्या कर्माप्रमाणें कदाचित् नरकप्राप्ति झाली असेल; परन्तु कर्णाची कांहीं तशी गोष्ट नव्हती. हा प्रक्षेप करणारानें कर्णाबरोबर पाण्डवांचे अभिमुखशस्त्राघातानें मेलेले प्रतिविन्ध्यादि कुमारही नरकांत टाकिले आहेत. परन्तु दुर्योधन इन्द्राच्या अर्ध्या आसनावर बसलेला त्याच पर्वांत आहे. हे या प्रक्षेपकाच्या लक्ष्यांत नव्हते असें दिसतें. असो.

**समाप्ति.** ७. वाचक हो ! येथें कर्णचरित्र संपलें. आतां प्रस्तुत कर्णचरित्रावरून स्थूलदृष्टीनें साधारण वाचकांच्या मनांत काय विचार येतील, हें पुढील शेवटल्या भागांत सांगून मी रजा घेणार आहें.

११

# उपसंहार-पर्व.

**कर्णाचें वय.** १. कर्ण हा कुन्तीला साधारणतः तिच्या वयाच्या अठराव्या वर्षीं झाला असावा असें अनुमान करण्यास कांहीं हरकत नाहीं. पुढे लवकरच तिचें पण्डूबरोबर लग्न झालें असेल. वर्ष सहा महिने तिच्यासह उपभोगांत काढिल्यावर पण्डूस किन्दम ऋषींचा "प्रियेशीं सुरतक्रीडा करितांच तुला मृत्यु येवो!" असा शाप झाला असावा, म्हणजे या समयीं कुन्ती वीस वर्षांची झाली असेल. पण्डूस झालेल्या या शापानें अर्थातच त्याचें प्रजोत्पादन खुंटलें. म्हणून त्याच्याच परवानगीनें किंवा आज्ञेनें तिनें यम, वायु व इन्द्र यांपासून अनुक्रमें धर्म, भीम व अर्जुन असे तीन पुत्र नियोगविधीनें उत्पन्न करून घेतले. या प्रत्येकांत साधारणतः एक एक वर्षाचें अंतर असेल अशी आपण कल्पना केली, व धर्म हा कुन्तीस एकविसाव्या वर्षीं झाला असें कल्पिलें तर कर्ण हा धर्मापेक्षां तीन वर्षांनीं व अर्जुनापेक्षां पांच वर्षांनीं वडील असावा असें सिद्ध होतें. भीम व दुर्योधन हे सारख्या वयाचे होते, अर्थात् दुर्योधनापेक्षां कर्ण चार वर्षांनीं मोठा असेल. भारतीयुद्धांत भीष्म एकशें वीस वर्षांचे असावेत असें अनुमानानें ठरवितां येतें. व हें जर खरें असेल तर त्यांच्या वयाच्या पन्नासाव्या वर्षीं कर्णाची उत्पत्ति झाली असावी असें ठरेल. भीष्म, द्रोण, कृपाचार्य हे जवळ जवळ सारख्याच वयाचे होते. म्हणजे ही त्रयी कर्णापेक्षां सरासरी

पन्नास वर्षांनीं वडील होती. धृतराष्ट्र हा कर्णापेक्षां वीस वर्षांनी वृद्ध असेल, असें स्थूल अनुमानावरून दिसतें. म्हणजे भारतीययुद्धप्रसंगीं कर्ण सत्तर वर्षांचा असावा असें ठरतें. भीष्म, द्रोण, कृप हे कर्णापेक्षां इतके जरी वृद्ध होते, तरीही कर्ण त्यांच्याशीं रात्रंदिवस स्पर्धा करीत असे. इतका तो तेजस्वी, मानी, शूर व आत्मप्रत्ययी होता. सूर्यादि देवांपासून कर्णादि मानवांची उत्पत्ति कशी झाली, हें गूढ समाधानकारक रीतीनें आजला सोडवितां येणें शक्य नाहीं. पाण्डवकालीं नियोगपद्धति सर्वत्र रूढ होती, परन्तु कन्यावस्थेंत सन्तति होणें हें दुष्कृत्य मानीत असत असें दिसतें. तथापि त्याचें स्वरूप आजच्या इतकें उग्रतर नसावें. कारण, पाण्डवांना येऊन मिळण्याविषयीं कुन्तीनें, कृष्णानें व भीष्मांनींही कर्णास प्रेमपूर्वक एकान्तांत सांगितलें होतें. धर्मराजाच्या उद्गारावरून तोही कर्णाला वडील बन्धूचे सर्व हक्क देण्यास तयार होता असें दिसतें. तात्पर्य वैवाहिक बन्धनें पाण्डवकालीं धर्मशास्त्रानें शिथिल परन्तु सुप्रजाजननशास्त्राच्या दृष्टीनें उदात्त अशीं होतीं असें दिसतें.

**मातृविख्यातत्व.**

२. अर्वाचीन कालीं स्त्रीविख्यातत्वाप्रमाणेंच मातृविख्यातत्वही कमीपणाचें मानितात. किम्बहुना, त्याचा अर्थ असा करितात कीं, पित्याचा पत्ता नसलेल्या मनुष्यानेंच मातेच्या नांवानें प्रसिद्ध असावें. प्राचीन कालीं पित्याप्रमाणेंच मातेच्या नांवानेंही ओळखण्याची चाल होती, असें दिसतें. उदाहरणार्थ, गाङ्गेय, कौन्तेय, कार्तिकेय, राधेय, सौभद्र, द्रौपदेय, देवकीनन्दन, काद्रवेय, वैनतेय, आदित्य अशीं शेंकडो उदाहरणें भारतरामायणादि ऐतिहा-

सिक ग्रन्थांत आढळतात. व यावरूनच मातृविख्यातत्व ही सर्व-साधारण व सर्वमान्य पद्धति होती, असें निश्चित अनुमान होतें.

३. कर्णाला सूतपुत्र म्हणत असत. सूत ही एक संकीर्ण जाति असून तिचा धंदा रथ हांकण्याचा होता.

**अधिरथाचा वंश**

क्षत्रियांपेक्षां ही हीन जाति होय. कर्णाचा पिता अधिरथ हा धृतराष्ट्राचा रथ हांकीत असे. एवढ्यावरूनच कर्णाला सूतपुत्र म्हणत असत, असें दिसतें. कारण, भागवतांतील वंशावळीवरून पाहतां, अधिरथ हा अस्सल चन्द्र-वंशीय क्षत्रिय होता असें ठरतें. तो वंश याखालीं दिला आहे:–

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ चन्द्र. | ८सभानर. | १५रुषद्रथ. | २२ धर्मरथ. | २९ विजय. |
| २ बुध. | ९कालनर. | १६ हेम. | २३ चित्ररथ. | ३० धृति. |
| ३ पूरुरवा. | १०सृञ्जय. | १७ सुतपा. | २४ चतुरङ्ग. | ३१ धृतव्रत. |
| ४ आयु. | ११जनमेजय. | १८ बलि. | २५ पृथुलाक्ष. | ३२ सत्कर्मा. |
| ५ नहुष. | १२महाशील. | १९ अङ्ग. | २६ बृहद्रथ. | ३३अधिरथ. |
| ६ ययाति. | १३महामन. | २०खनपान. | २७ बृहन्मना. | ३४ कर्ण. |
| ७ अनु. | १४तितिक्षु. | २१दिवीरथ. | २८ जयद्रथ. | ३५ वृषसेन. |

वर दिलेल्या वंशावळीवरून असें स्पष्ट सिद्ध होतें कीं, अधिरथ हा क्षत्रिय होता. आतां त्यानें क्षत्रियांचे गुणकर्म सोडून देऊन रथ हांकण्याचा धंदा पतकरिल्यामुळें, लोक त्यास सूत म्हणूं

लागले. त्यानेंही आपले व आपल्या वंशजांचे सर्व संस्कार सूताप्रमाणेंच करण्यास प्रारम्भ केला होता, परन्तु यावरून पाण्डवकालीं गुणकर्मावरून वर्णव्यवस्था होती असें मात्र मुळींच ठरत नाहीं.

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**

असें सांगणारे प्रत्यक्ष श्रीकृष्ण देखील कर्णास क्षत्रिय म्हणत नव्हते. जर वर्णव्यवस्था गुणकर्माप्रमाणेंच वारंवार बदलत असती तर अधिरथाला ज्याप्रमाणें सूतत्व प्राप्त झालें, त्याचप्रमाणें कर्णालाही क्षत्रियत्व प्राप्त व्हावयास पाहिजे होतें. परन्तु तें ज्या अर्थीं प्राप्त झालें नाहीं, त्या अर्थीं गुणकर्मावरून वर्णव्यवस्था ठरत नव्हती असेंच सिद्ध होतें. कर्णाच्या आयुष्याच्या शेवटच्या दिवशीं त्याचा आणि शल्याचा जो संवाद झाला, त्यांत कर्णानें शल्य ज्या देशचा राजा होता त्या मद्रदेशांतील लोकांचीं कांहीं व्यंगें सांगितलीं आहेत, त्यांत त्यानें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, “ शतद्रु, विपाशा, इरावती, चन्द्रभागा आणि वितस्ता या नद्यांमधील प्रदेशास आरट्ट देश म्हणतात. तेथें एकाच कुटुंबांत अनेक जातीचे व वर्णाचे लोक असतात, आणि म्हणूनच तेथें वर्णसंकर झालेला आहे.” यावरूनही असेंच सिद्ध होतें कीं, गुणकर्मानुसार वर्णव्यवस्था असणें हा वर्णसंकर होय, असें महाभारतकालीं मानीत असत; द्रौपदीस्वयंवरप्रसङ्गींही कर्णाचें सूतत्वच त्याला आडवें आलें. म्हणजे तो गुणकर्मानें क्षत्रिय असून, संस्कारांनीं सूत झाल्यामुळें, द्रौपदीस वरण्याचा त्याचा अधिकार नष्ट झाला होता. उच्च वर्णांतून नीच वर्णांत येण्यास आजच्याप्रमाणेंच तेव्हांही कांहीं हरकत नसे, म्हणजे ब्राह्मण हा शूद्र होऊं शकत असे. परन्तु शूद्रास मात्र ब्राह्मणत्व प्राप्त होत नव्हतें. याचें तात्पर्य इतकेंच कीं, वर्णव्यवस्था आजच्याप्रमाणेंच भारतकालींही अस्तित्वांत होती.

४. पण्डूच्या निधनानंतर पाण्डव, धृतराष्ट्राकडेस हस्तिनापुरीं आले. पुढें कौरवपाण्डवांस द्रोणाचार्यांकडून युद्धशिक्षा मिळून त्यांची परीक्षा घेण्यांत आली. तेव्हां रंगस्थळीं दुर्योधनानें कर्णास अंगदेशाचें राज्य दिल्याचा उल्लेख आहे. तेथें असा प्रश्न उपस्थित होतो कीं दुर्योधनास असा काय अधिकार होता कीं, जेणेंकरून तो सबंध अंगदेशचें राज्य कर्णास देण्यास समर्थ झाला? दुर्योधन त्या वेळीं युवराजही नव्हता. कारण आदिपर्वांत उपर्युक्त प्रकारानंतरच्या वर्णनांत धृतराष्ट्रानें धर्मराजास यौवराज्य दिल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. तेथें पूर्वी अमक्याकडेस असलेलें हें पद हिरावून घेऊन युधिष्ठिरास दिल्याचा कांहीं उल्लेख नाहीं. बरें! घटकाभर आपण असें गृहीत धरूं कीं, हें पद दुर्योधनाकडेस पूर्वी होतें. परंतु या पदांत असा व इतका अधिकार ते वेळीं होता कीं काय, याची शंका येते. मग धृतराष्ट्राच्या सम्मतीनें जर हें अंगदेशाचें राज्य कर्णास दुर्योधनानें दिलें असल्यास न कळे. किंवा या भागाच्या तिसऱ्या कलमामध्यें दिलेल्या वंशावळीप्रमाणें अङ्गदेशचा प्रस्थापक अंगराजा हा कर्णाचा पूर्वज असून संस्कारहीनतेमुळें सूतत्व प्राप्त झालेल्या कर्णास आपल्या पूर्वजांचें राज्य प्राप्त झाल्यास क्षत्रियत्वही प्राप्त होईल, अशा समजुतीनें अङ्गदेशाचें राज्य त्याला दिलें असल्याचा संभव आहे.

**दुर्योधनाचा अधिकार.**

५. इंद्रास कवचकुंडलें दान देण्याच्या सुमारास कर्णाला त्याचें व पांडवांचें नातें कळलें असावें. त्या पूर्वी त्याला या गोष्टीचा मुळींच गंध नव्हता असें वाटतें. कारण हें नातें जर त्याला प्रथमच ठाऊक असतें तर त्यानें भरसभेंत द्रौपदीची जी अवहेलना केली

**कर्णाची असभ्यता.**

ती खात्रीनें केली नसती. कौरवांनीं पांडवांना छळण्यांत जे नीच-पणाचे प्रकार वारंवार केले, त्या प्रत्येकांत कर्ण सामील होता, असें महाभारतावरून दिसत नाहीं. तत्रापि द्यूतप्रसंगीं द्रौपदीला उद्देशून असलेलें कर्णाचें भाषण म्हणजे मूर्तिमंत नीचपणा होय. भरसभेंत एकाद्या स्त्रीला, 'अपति,' 'स्वैरिणी,' 'दासभार्या,' 'सुरतपरा,' इत्यादि शब्दांनीं संबोधणाऱ्या व्यक्तीची गणना शौर्यदृष्ट्या सिंहांत झाली तरी नीतिदृष्ट्या चतुष्पादांतच होईल.

**घोषयात्रापर्वाचा अप्रक्षिप्तपणा.**

६. घोषयात्रापर्वाचा जो उल्लेख कर्णचरित्रांत आलेला आहे, तत्सम्बन्धीं कांहीं विवेचन करणें अवश्य आहे. कारण हें पर्व प्रक्षिप्त आहे असा कित्येक विद्वानांचा तर्क आहे. हें जर खरोखरींच प्रक्षिप्त ठरलें, तर त्यांत कर्णाची योग्यता वाढणार आहे. परन्तु तें तसें ठरत नाहीं. ' दुर्योधनाची फिर्याद ' या नांवाचा एक लेख, विविधज्ञानविस्ताराच्या सन १९११ च्या मे व जूनच्या अंकांत प्रसिद्ध झालेला आहे. त्यांत कैरात व घोषयात्रा हीं दोन पर्वें प्रक्षिप्त असल्याचें लिहिलें आहे. म्हणून हीं दोन पर्वें प्रक्षिप्त आहेत कीं काय, याचा विचार करूं. घोषयात्रापर्वाबद्दल रा. गोखले म्हणतातः—

" हें आख्यान प्रक्षिप्त असल्याचीं अनेक चिन्हें आहेत........ घोषयात्रेचा प्रक्षिप्तपणा सिद्ध करणें विशेष कठिण नाहीं. कारण ज्यावेळीं ही हकीकत द्वैतवनांत घडली, त्यावेळीं पाण्डव द्वैतवनांत मुळीं नव्हतेच. वनवासाचीं दहा वर्षें संपल्यावर त्यांनीं ( पांडवांनीं ) गन्धमादन सोडिलें. अकरावें वर्ष बरेंचसें विशाखायूप वनांत काढिलें. बारावें वर्ष जवळ आलें त्या वेळीं ते द्वैतवनांत गेले; व थोडे महिने म्हणजे पावसाळा

संपेपर्यन्त तेथें राहून पुढें काम्यकवनांत गेले. या नन्तर द्वैतवनांत घडलेली घोषयात्रापर्वांतली हकीकत ! घोषयात्रेच्या वतीनें साक्ष देणारे मृगस्वप्नोद्भवपर्वकार म्हणतात कीं, या खेपेला पाण्डव द्वैतवनांत १ वर्ष ८ महिने राहिले होते. म्हणजे वनवासाच्या बारा वर्षांपैकीं १२ वर्षें ८ महिने संपून पुढील अध्यायाकरितां बारावें वर्ष शिल्लक राहिलें ! घोषयात्रा-पर्वाचे लेखकानें डोळे मिटून भारत वाचलें असावें; नाहीं तर दुर्योधनाप्रीत्यर्थ दिग्विजय करितांना कर्णानें द्रोणाच्या राज्या-वर स्वारी करून अहिच्छत्र जिंकिलें नसतें, आणि स्वतःच्या अंगराज्यावर तर खात्रीनें स्वारी केली नसती ! ”

रा. गोखल्यांच्या या म्हणण्याचा आतां आपण विचार करूं. तो करण्यासाठीं पाण्डवांनीं वनवासांत कसकसा प्रवास केला व ते कोठें किती किती दिवस राहिले, याची माहिती महाभारतांत किती मिळते हें पाहणें अवश्य आहे. म्हणून ती वनपर्वांतून खालीं देतों. (वाक्यापुढील दोन आंकडयांपैकीं पहिला अध्यायाचा असून दुसरा श्लोकाचा आहे. सर्वत्रांच्या सोईसाठीं भारताची वांईस छापलेली समूलभाषान्तराची प्रत घेतली आहे. ही सर्व हकीकत वनपर्वांतील आहे हें वाचकांस पुनः सांगण्याची जरूरी नाहीं.)

१ पांडव जान्हवीतीरापासून कुरुक्षेत्रामध्यें गेले. ( ५-१ )

२ तेथून काम्यकवनांतप्रयाण,व तेथें जाण्यात तीन अहोरात्रें लागलीं. ( ११-३ )

३ काम्यकवनांतून द्वैतवनांत प्रवेश. ( २४-१२.१४ )

४ द्वैतवनांतून काम्यकवनांत पुनरागमन. ( ३६-४१ )

५ येथें, म्हणजे काम्यकवनांत, असतांनाच अर्जुन इन्द्रदर्श-नार्थ हिमालयावर जातो.

६ अर्जुनगमनानन्तर धर्मराजा काम्यकवनांत तीन रात्री राहिला. ( २७-९२ )

७ मार्गशीर्ष पौर्णिमा झाल्यावर पुष्यनक्षत्रावर युधिष्ठिराचें तीर्थयात्रेस प्रयाण. ( ९४-२७ )

८ पुढें नरनारायणाश्रमांत चार वर्षें वसति. ( १५८-३ )

९ तेथून १७ दिवसांनीं हिमालयाचे पायथ्याशीं आगमन. ( १५८-१८ )

१० पुढें चार दिवसांनीं गन्धमादन पर्वत. ( १५८-३१ )

११ त्यानन्तर माल्यवान् पर्वत. ( १५८-३७ )

१२ त्यापुढें मन्दर पर्वत. ( १६''-१ )

१३ अर्जुन इन्द्राकडेस पांच वर्षें राहिला. (१६५-१७ )

१४ युधिष्ठिर गन्धमादन पर्वतावर असतांना अर्जुन परत येतो. (१६५-२०)

१५ अर्जुनासह गन्धमादन पर्वतावर चार वर्षें वास्तव्य व पूर्वी गेलेलीं सहा वर्षें, मिळून दहा वर्षें वनवास झाला. ( १७६-'२,६ )

१६ तेथेंच अकरावें वर्षें सुरू झालें. (१७६-८)

१७ गन्धमादनाहून परत येतांना कैलासपर्वत. (१७७-२)

१८ तेथून वृषपर्व्याश्रम व तेथें एक रात्र वसति. (१७७-६ )

१९ पुढें सुबाहूचें नगर. ( १७७-१२ )

२० नन्तर यमुनोद्भमपर्वत व त्यापुढें विषाखायूपवन या विषाखायूपवनांत एक वर्ष वसति. ( १७७-१६ )

२१ बारावें वर्ष जवळ आल्याचा उल्लेख. (१७८-२०)

२२ तेथून द्वैतवन नामक सरोवराकडेस गमन. ( १७८-२१ )

२३ गन्धमादनाहून काम्यकवनाकडेस कार्तिकी पौर्णिमेस प्रयाण. ( १८२-१८ )

२४ पुढें द्वैतवनांतून काम्यकवन. ( २५९-१३ )

याप्रमाणें पांडवांचा बारा वर्षांचा काल गेलेला आहे. शेवटीं शेवटीं ‘ द्वैतवनांत ’ पाण्डव ‘ एक वर्ष आठ महिने राहिले होते’, हें जें रा. गोखल्यांचें म्हणणें आहे त्याला प्रमाण वगैरे त्यांनीं कांहीं एक दिलेलें नाहीं. मृगस्वप्नोद्भव पर्वांत एक वर्ष आणि आठ महिने या कालाचा ऊल्लेख आहे ही गोष्ट खरी. परंतु त्यावरून, पाण्डव, एवढी मुदत द्वैतवनांत शेवटीं राहिले होते असें मुळींच सिद्ध होत नाहीं. मृगस्वप्नोद्भव पर्वाची हकीकत अशी आहे कीं, पाण्डवांनीं द्वैतवनांतील मृग इतके मारिले कीं, अखेरीस तें वन निर्मृग होण्याची पाळी आली. हें पाहून धर्मराजाच्या स्वप्नांत कांहीं मृग आले व त्यांनीं त्यास तें वन सोडून जाण्यास नम्रतापूर्वक विनन्ती केली. धर्मराजास ती पटली, व तो आपल्या बन्धूंस म्हणाला, “ मृगांनीं जें हें सांगितलें तें अगदीं खरें आहे, व त्या वनचरांवर दया करणें आपलें कर्तव्य आहे. कारण एक वर्ष आठ महिने आपण यांना भक्षण करीत आहोंत.*” या धर्मराजाच्या उल्लेखावरून असें उघड दिसतें कीं, पाण्डवांचा द्वैतवनामध्यें एकंदर एक वर्ष आणि आठ महिने वास होता. व पाण्डव आरम्भींच काम्यकवनांतून द्वैतवनांत गेल्याचा उल्लेखही आहे. आणि गन्धमादनाहून ते एकदम कांहीं द्वैतवनांत आले नाहींत. कांहीं दिवस काम्यकवनांत व कांहीं दिवस जान्ह-

* ते सत्यमाहुः कर्तव्या दयास्माभिर्वनौकसाम् ।
साष्टमासं हि नो वर्षं यदेनानुपयुङ्क्ष्महे ॥
वनपर्व, अ. २५९, श्लो. १२.

वीचे तीरीं राहिले होते, असें १७८ व्या अध्यायावरून दिसतें. कारण त्यांत पर्वतसमुदायांचा व विशेषत: सरस्वतीचा तर स्पष्टच उल्लेख असून शेवटीं तर काम्यकवनाकडेस निघाल्याचेंही लिहिलें आहे. यावरून 'पावसाळा संपेपर्यंत ते द्वैतवनांत राहिले' असें जें रा. गोखल्यांचें म्हणणें आहे तें खरें नाहीं, हें वाचकांच्या लक्ष्यांत येईलच. पावसाळा सम्पेपर्यंत ते, गन्धमादन व सरस्वतीचें तीर या बाजूलाच होते. म्हणजे ते द्वैतवनांत दुसऱ्यानें राहण्यास आले, ते चारसहा महिन्यांहून अधिक राहिले असतील असें मुळींच सम्भवत नाहीं. वैष्णवयागास, कर्णाच्या दिग्विजयास व घोषयात्रेस ही मुदत पुरेशी आहे. पाण्डवांच्या या दोन वेळच्या वसतीनें द्वैतवन निर्मृग होण्याचा संभव मृगांस दिसल्यानें त्यांनीं स्वप्नांत ही गोष्ट त्यांस कळविली, व म्हणून ते तेथून निघून गेले. या एकन्दर गोष्टींचा शान्त चित्तानें विचार केला म्हणजे बारा वर्षांचा हिशेब खालीं दिल्याप्रमाणें बसतो.

| व. | म. | |
|---|---|---|
| १ | ८ | द्वैतवनांत वसति. |
| ५ | ० | तीर्थयात्रा आणि नरनारायणाश्रमवास. या मुदतींत अर्जुन आपल्या बापाकडेस म्हणजे स्वर्गांत होता. |
| ४ | ० | गन्धमादनपर्वतावर अर्जुनासह वास्तव्य. |
| १ | ४ | काम्यकादि इतर ठिकाणीं प्रवास. |
| १२ | ० | एकूण बारा वर्षें. |

अशा संगतीनें विचारपूर्वक हिशेब बसविला म्हणजे घोषयात्रापर्वाच्या प्रक्षिप्तपणाचा मुख्य आधार जो मुदतीसम्ब-

न्धाचा, तो, कसा लंगडा आहे हें वाचकांच्या सहज लक्षांत येईल. ही गोष्ट रा. गोखल्यांच्याही लक्षांत आली असावी असें वाटतें व म्हणूनच त्यांनीं दुसरें प्रमाण कर्णाच्या दिग्विजयाचें दिलें आहे. ते तेथें म्हणतात, " दिग्विजय करितांना कर्णानें द्रोणाच्या राज्यावर स्वारी करून अहिच्छत्र जिंकिलें नसतें.—"पण कां जिंकिलें नसतें, हें मात्र ते सांगत नाहींत. अर्जुनानें दिग्विजय-प्रसंगीं द्वारकेवर स्वारी केल्याचा उल्लेख आदिपर्वांत आहे, तो रा. गोखल्यांना दिसला नाहीं यांत भारतकाराचा काय दोष बरें ? दिग्विजयाची प्रतिज्ञा सत्य करावयाची म्हणजे, यच्चयावत् राज्यांवर स्वारी करावयाची. व त्याप्रमाणें कर्णानें केल्याचा ऊल्लेख आहे. आतां अङ्ग राज्यावर स्वारी केल्याबद्दल रा. गोखल्यांची तकरार आहे. पण त्यानें अंगदेश ताब्यांत घेतल्याचा उल्लेख आहे, स्वारी केल्याचा कांहीं उल्लेख नाहीं. यावरून असें उघड दिसतें कीं, आदिपर्वांतील रंगस्थानामध्यें जें त्याला अंगदेशचें राज्य दुर्योधनाकडून मिळालें त्यावेळीं कांहीं त्यानें त्या राज्याचा कारभार हातांत घेतला नव्हता, फक्त हस्तिनापुरांत राहून शेवटचे हुकूम मात्र तो सोडीत असावा. दिग्विजयास निघाल्यावर आपल्या राज्यांत जाऊन त्यानें तेथील व्यवस्था लाविली असली पाहिजे. ही गोष्ट सरळ आहे. पण दुष्टपूर्व-ग्रहानें विकारवश झाल्यावर ही सरळ गोष्ट रा. गोखल्यांना वांकडी दिसावी यांत आश्चर्य तें काय ? असो. ' हे ( घोषयात्रा ) पर्व प्रक्षिप्त असल्याचीं अनेक चिन्हें आहेत........घोषयात्रेचा प्रक्षिप्तपणा सिद्ध करणें विशेष कठिण नाहीं.' इत्यादि गर्जना करून जीं दोन प्रमाणें त्यांच्याकडून मजबूत म्हणून पुढें आलीं त्यांची व्यवस्था वर लाविली आहे. तीवरून हें पर्व निदान या

दोन प्रमाणांनीं तरी प्रक्षिप्त ठरत नाहीं, एवढें वाचकांच्या लक्षांत येईल. कोणत्याही ग्रंथांत प्रक्षिप्त भाग दर्शविणें ही गोष्ट खरोखरीच रा. गोखल्यांना वाटते तेवढी सोपी असती तर संस्कृत ग्रन्थ सर्वच आजला जवळ जवळ नामशेष झाले असते, ही गोष्ट प्रत्येक शोधकानें लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

**७. पांडव अज्ञातवासांत असतांना त्यांना शोधून काढण्यासाठीं कर्णानें दुर्योधनास वारंवार सुचविलें आहे.**

**वैराट पर्वाचा अप्रक्षिप्तपणा.** पांडवांना-विशेषतः धर्मराजाला-या तेरा वर्षांच्या अवधींत कर्णाच्या धाकानें रात्रंदिवस झोंप येत नसे. वनवासाचे तेरा महिने पूर्ण झाल्यावर एका दिवशीं धर्मराजास भीमादि पांडव म्हणाले, "तेरा वर्षांच्या ऐवजीं तेरा महिने पूर्ण झालेले आहेत; आतां यापुढें वनवासांत न राहातां आपण एकदम सर्वांनीं मिळून कौरवांवर स्वारी करावी. कारण हा वनवासांतील त्रास आम्हांस आतां सहन होत नाहीं. व बारा वर्षांच्या अवधींत कितीतरी शारीरिक व मानसिक फेरफार होऊन जातील.!" यावर, धर्मराजानें या म्हणण्याचा प्रथमतः निषेध केला व शेवटीं तो म्हणाला, "भीष्म, द्रोण, कृपाचार्य, अश्वत्थामा या सारख्या वीरांशीं झुंजावयाचें आहे, ही गोष्ट तुम्ही साफ विसरलां आहांत व या सर्वांपेक्षाही महाक्रोधी कर्णाची धास्ती तर मला फारच वाटत आहे. कारण तो एकटाच आपणां सर्वांस गट्ट करून टाकील. त्याची कृतास्त्रज्ञता मोठी विलक्षण व अलौकिक आहे, म्हणून आपण अस्त्रप्राप्तीचा कांहीं तरी उपाय योजूं."

या धर्मराजाच्या उद्गारावरून, कर्णाची भीति त्यास किती होती, हें सहज दिसून येतें, व या साठींच पुढें व्यासाच्या

उपदेशावरून धर्मराजानें अर्जुनास इंद्रदर्शनार्थ व अस्त्रप्राप्त्यर्थ हिमालयावर पाठविलें आहे. पूर्वोक्त रा. गोखले म्हणतात:—

"या ( कैरात ) पर्वांत अर्जुनाची हिमालयपर्वतावरील तपश्चर्या, श्रीशंकराशीं युद्ध आणि ब्रह्मशिर नामक अस्त्राची प्राप्ति, ही हकीकत आहे·हें आख्यान प्रक्षिप्त आहे. अर्जुनाला ब्रह्मशिर अस्त्राची प्राप्ति पूर्वींच झालेली होती. कैरात पर्वाच्या पूर्वींच्या अध्यायांत अर्जुन फक्त इंद्राला भेटण्याकरितां युधिष्ठिराला सोडून निघाला असें स्पष्ट म्हटलें आहे. कैरात पर्वांत तो इंद्र आणि शंकर यांचें दर्शन घेण्याकरितां निघाला, असा दोघांचा उल्लेख आहे. पूर्वींच्या अध्यायांत अर्जुन हिमालयावर न थांबतां तसाच पुढें इंद्रकील पर्वतावर गेला असें म्हटलें आहे. या लेखकाचे बुद्धीप्रमाणें फक्त इंद्राला भेटावयास जाणारा प्रवासी हिमालयावर थांबणार नाहीं असें असल्यामुळें त्यानें अर्जुनाला पुढें नेलें; परंतु कैरात पर्वाचा प्रक्षेप करणाराचे मलाखतीकरितां अर्जुनाला तेथें पांच महिने थांबावें लागलें."

आतां या म्हणण्याचा आपण विचार करूं. कैरातपर्व प्रक्षिप्त आहे याला रा. गोखले तीन प्रमाणें देतात:—

१ अर्जुनाला ब्रह्मशिर नामक अस्त्राची प्राप्ति पूर्वींच झाली होती.

२ पूर्वींच्या अध्यायांत अर्जुन फक्त इन्द्रासच भेटण्यास गेला, असें सांगितलें असून या पर्वांत तो इन्द्र व शंकर या उभयतांस भेटण्यास गेल्याचा उल्लेख आहे.

३ हिमालय व इन्द्रकील हे भिन्न भिन्न पर्वत आहेत.

**पहिला मुद्दा** ब्रह्मशिरोस्त्राचा. ब्रह्मास्त्र आणि ब्रह्मशिरोस्त्र हीं एकच कीं भिन्न, हें तज्ज्ञाशिवाय इतरांस कळणें आजला मुळींच शक्य नाहीं. आदिपर्वांत ब्रह्मास्त्र अर्जुनास द्रोणांनीं पढविल्याचा उल्लेख आहे, तेथील एकंदर द्रोणकृत प्रशंसेवरून हें अस्त्र अर्जुनाशिवाय इतरांस द्रोणांनीं शिकविलें नसावें असें अनुमान निघतें, परंतु द्रोणपर्वांत धर्मराजानेंही प्रत्यक्ष द्रोणाचार्यांवर याच अस्त्राचा प्रयोग केल्याचा उल्लेख आहे. कर्णासारखी, धर्मानें, ब्रह्मास्त्रासाठीं कोणाचीही सेवा केल्याचा भारतांत उल्लेख नाहीं, असें असतांही ब्रह्मास्त्र त्यास येत होतें. यावरून असें वाटतें कीं, ब्रह्मास्त्रांतही कांहीं प्रकार असतील. गायत्रीमन्त्र उलटा म्हणणें हाच ब्रह्मास्त्राचा मंत्र होय असा लोकप्रवाद आजला प्रसिद्ध आहे. परन्तु ही ब्रह्मास्त्रासंबंधींची गोष्ट संशयित राहते. याबद्दल तर्कानें फार तर एवढेंच सांगतां येईल कीं, नुसती ' बी. ए. ' ची परीक्षा पसार होणें, उत्तीर्ण होणारांच्या गणनेंत वर असणें, अध्यापकपद (Professorship) मिळवितां येण्याजोगें पारंगत होणें व संमानपूर्वक ( with honours ) यशस्वी होणें, यांत जो भेद आज आपणांस प्रत्यक्ष दृग्गोचर होत आहे, तसलाच कांहीं तरी प्रकार या ब्रह्मास्त्रांत असला पाहिजे. व म्हणून या पहिल्या मुद्द्यानें कैरात पर्व प्रक्षिप्त ठरत नाहीं. आतां **दुसरा मुद्दा**, अर्जुनानें इंद्रास भेटण्यास जावें हा उपदेश व्यासमहर्षींचा. तथें ते फक्त इंद्राचेंच नांव न घेतां अनेक देवांचीं नांवें घेतात. त्यांत रुद्राचेंही नांव आहे हें रा. गोखले विसरले. याला इतरानें काय करावें ? व्यासमहर्षींच्या आज्ञेप्रमाणें धर्मराजानें अर्जुनास देवदर्शनास पाठविलें. आतां तेथें जरी फक्त इन्द्राचा उल्लेख असला व इतरांच्या

नांवांची द्विरुक्ति नसली तरी चालण्यासारखें आहे. एकादा मनुष्य कलेक्टरास भेटण्यास त्याचे कचेरींत गेला तर आपण "तो कलेक्टरास भेटण्यास गेला," असें म्हणतों, परंतु याचा अर्थ तो फक्त कलेक्टरासच भेटण्यास गेला असाच करावयाचा काय? कचेरींत तो 'कलेक्टरा'च्या सन्निध असलेल्या कितीतरी लोकांस भेटत असतो! हा साधा व्यवहारही रा. गोखले स्मरत नाहींत. प्राचीन पौराणिक गोष्टींचा विचार कर्तव्य असतां साधी व्यावहारिक माहिती अगदींच गुंडाळून ठेवावी असा जर—ज्याचें वारें रा. गोखल्यांच्या अंगात प्रविष्ट झालें आहे त्या—चार्वाकाचा उपदेश व उद्देश असेल तर न कळे. **आतां तिसरा मुद्दा.** इन्द्रकील व हिमालय हे भिन्न भिन्न पर्वत आहेत कीं काय? याचा निर्णय करण्यास अर्जुनानें प्रवास कसा केला, हें आपण पाहिलें पाहिजे. (वाक्याच्या पुढील दोन आंकड्यांपैकीं, मागीलप्रमाणेंच पहिला अध्यायाचा असून दुसरा श्लोकाचा आहे.)

१ अर्जुन हिमालयाकडेस गेला. ( ३७–३९ )
२ तेथून गन्धमादन. ( ३७–४२ )
३ पुढें इन्द्रकील पर्वत व इन्द्रदर्शन. ( ३७–४२ )
४ तेथून हिमालयाचें शिखर. ( ३८–१५ )
५ पुढें स्वर्ग. ( ३८–१६ )
६ पुढें हिमालयाचा पृष्ठभाग. ( ३८–१६ )
७ पुढें अमरावती. ( ४३–४२ )
८ अमरावतीस अर्जुन पांच वर्षें राहिला. ( १६५–१७ )
९ गन्धमादन पर्वतावर परत आला. ( १६५–२० )

१० गन्धमादन पर्वतावर अर्जुनासह सर्व पाण्डव चार वर्षे राहिले. ( १७६–५,६ )

या अर्जुनाच्या प्रवासाचा बारकाईनें विचार केला तर, गन्धमादन, इन्द्रकील, स्वर्ग, अमरावती,इत्यादि सर्व ठिकाणें हिमालयावरच असून त्याच्याच निरनिराळ्या भागांस हीं नामाभिधानें असावींत असें अनुमित होतें. रा.गोखल्यांच्या मताप्रमाणें जर इन्द्रकील पर्वत हिमालयाच्या पुढें असता तर त्या पर्वतापुढें हिमालयाच्या शिखराचा व पृष्ठभागाचा उल्लेख येणें शक्य नाहीं. परन्तु ज्या अर्थीं तो आलेला आहे, त्या अर्थीं वरील अनुमानच खरें आहे. निदान अर्जुनाभिगमनप्रसंगीं किंवा भारतलेखनकालीं तरी तसाच समज असावा हें खास. तात्पर्य, रा. गोखल्यांच्या तीन प्रमाणांपैकीं एकाही प्रमाणानें कैरातपर्व प्रक्षिप्त ठरत नाहीं. हा एवढा विस्तार येथें सांगण्याचें कारण इतकेंच कीं, कर्णाच्या धास्तीनेंच अर्जुनाला अस्त्रप्राप्त्यर्थ इतका अट्टाहास करावा लागला, इतकें कर्णाचें अस्त्रनैपुण्य लोकोत्तर व अनुपमेय होतें.

**वर्तन शुद्ध व न्यायी असावें.**

८. कर्णाच्या ठिकाणीं दातृत्वाचा जो गुण होता व धार्मिकता, दयाशीलता इत्यादि विषयीं त्याची जी प्रसिद्धि होती ती यद्यपि यथार्थ होती, तथापि कर्णाचे हे सद्गुण कारणपरत्वें होते, असें सूक्ष्म विचाराअन्तीं वाटतें. दुर्गुणी मनुष्यास दुर्गुण झांकून ठेवून मानमान्यता मिळवावयाची असली म्हणजे तो आपण सभ्य असल्याचें इतरांस भासवीत असतो, तशांतून तो मनुष्य थोडासा देवभोळा असला तर

**अत्युत्कटैः पापपुण्यैरिहैव फलमश्नुते,**

हें वचन रात्रंदिवस त्याच्या मनांत घोळत असतें. कर्णाची स्थिति जवळ जवळ अशीच झालेली होती. पाण्डवांना छळण्यांत कौरवांबरोबर कर्णानेंही पुष्कळच अनाचार केला होता व तो त्यास रात्रंदिवस खात होता, शिवाय त्याला दोन शापही होते. यामुळें त्याला असें वाटत असे कीं, आपण जर पुण्यकर्मेंही अत्युत्कट केलीं तर आपलीं पातकें व आपणास झालेले शाप हीं आपणांस बाधणार नाहींत. या समजुतीनेंच तो पुष्कळ दानधर्म करीत असे. परन्तु हें त्याचें करणें लाथ मारून नन्तर पायां पडण्यासारखें होतें, आणि या मुळेंच त्याला त्याच्या सत्कृत्याचें त्यानें इच्छिलेलें फळ प्राप्त झालें नाहीं. जन्मभर वाईट गोष्टी करून मरतेवेळीं सत्कृत्य म्हणून एकादें देऊळ बांधणारांनीं कर्णाचें उदाहरण लक्ष्यांत ठेविण्यासारखें आहे. आत्म्याला शान्ति हवी असेल तर भीष्माप्रमाणें नेंहमीं शुद्ध व न्यायी वर्तन ठेविलें पाहिजे.

**कर्णाचें मित्रप्रेम.**

७. राजनिष्ठा हा गुण कर्णाप्रमाणें फारच थोड्यांच्या अंगीं वसत असतो, तसेंच कर्णाचें मित्रप्रेमही अवर्णनीय व अनुपमेय होतें. त्यानें दुर्योधनाशीं जें सख्य केलें तें आमरण पाळिलें. दुर्योधनाचा स्नेह तोडून कर्णानें पांडवांस मिळण्याबद्दल भगवान् श्रीकृष्णांनीं आपली शिकस्त केली; सर्व राज्य देऊं केलें, द्रौपदीचा भागही देण्याची लालूच दाखविली, पांडवांचें व त्याचें नातेंही सांगितलें, भावी युद्धांतील जयापजयाचें मूर्तिमन्त चित्र त्याच्यापुढें उभें केलें, किंबहुना त्याला मरणाचेंही भय दाखविलें; तथापि त्यानें दुर्योधनाचा पक्ष कांहीं सोडिला नाहीं. राज्यश्रीच्या लोभानें अश्वत्थामा मेला असें श्रीकृष्णाच्या उपदेशावरून असें द्रोणगुरूंस लटिकेंच सांगणारा युधिष्ठिर, प्रत्यक्ष गुरूची मान

कापणाऱ्याची गय करणारा व युद्धधर्म सोडून कृष्णाच्या सांग· ण्यावरून भूरिश्रव्याचा दक्षबाहु तोडणारा वीररसौघ अर्जुन, कृष्णाच्या खुणेवरून गदायुद्धाचा नियम सोडून दुर्योधनाच्या मांडी· वर गदा मारणारा भीम, यांपैकीं एक तरी व्यक्ति कर्णाच्या निस्पृह-पणाच्या, स्वामिनिष्ठेच्या, सत्यप्रीतीच्या, कर्तव्यदक्षतेच्या आणि कर्तव्यतत्परतेच्या पासंगास तरी पुरण्यासारखी आहे काय? कर्णाच्या आयुष्यांत दोन प्रसंग मोठया आणीबाणीचे व परीक्षेचे होते. पहिला प्रसंग कृष्णशिष्टाईचा व दुसरा कुन्तीकर्णसंवा-दाचा. कृष्ण आणि कुन्ती या दोन्ही व्यक्ति फारच वजनदार होत. परंतु कर्णापुढें यांचें वजन मुळींच चाललें नाहीं. भगवान् कृष्ण किंवा मातुश्री कुंती यांपैकीं कोणाच्याही नादीं लागून कोणाचीही आज्ञा परिपालन करून, कर्णानें मित्रद्रोह केला नाहीं. कुन्तीकरितां अर्जुनाशिवाय इतर पाण्डवांना न मारण्याचें मात्र त्यानें वचन दिलें व तें अक्षरशः पाळिलें. कर्ण आणि शल्य या व्यक्तींचीं कृत्यें एकसमयावच्छेदें करून नजरेपुढ आणिलीं म्हणजे कर्णाच्या चरित्राचा उदात्तपणा व शल्याचा अधमपणा हे तेव्हांच समजतात. कर्णानें मित्रासाठीं देहसुद्धां सोडिला व शल्यानें भाच्यांसाठीं हितशत्रूचें काम करून ऐनप्रसंगीं कर्णाचा तेजोवध करण्याचा प्रयत्न केला. बिभीषण आणि शल्य या दोन व्यक्तींची तुलना केल्यास बिभीषण शल्यापेक्षां श्रेष्ठ ठरेल, कारण तो उघड रीतीनें शत्रुसैन्यास जाऊन मिळाला होता. प्रत्यक्ष शत्रु हा हितशत्रूपेक्षां पुष्कळपटीनें चांगला असें कर्णानेंही शल्याला स्पष्ट सांगितलें आहे.

**सेनापति या नात्यानें कर्णाची योग्यता.**

१०. सेनापति या नात्यानें कर्णाची योग्यता फारच मोठी-किंबहुना भीष्मासारखी-आहे. कर्णाचा काल हा सेनापतींनीं लढण्याचा काल होता. प्रत्यक्ष युद्धक्षेत्रापासून शेंकडो योजनें दूर राहून लक्षावधि सैनिकांचे जीव, युद्धक्षेत्रावर स्वतःच्या इच्छेनें वाटेल तसे वागविणें हें अर्वाचीन कालचें युद्धशास्त्र पानिपतच्या लढाईपर्यंतही आम्हां पौरस्त्यांस अवगत नव्हतें. असो. कोणतीही शिस्त नवीन लाविणें हें जितकें अवघड आहे, त्यापेक्षां बिघडलेली शिस्त पुनः सुधरून पूर्वपदावर आणणें हें शतपटीनें अधिक अवघड आहे. सेनापति कर्णाची योग्यता या कारणानेंच अधिक आहे. प्रथम भीष्मांनीं मूळ शिस्त लावून दिली कीं न्यायानें लढावें, पळत असल्यास त्याला मारूं नये, रात्रीं युद्ध बंद करावें इत्यादि. या सर्व गोष्टी द्रोणाचार्यांच्या कारकीर्दींत लुप्त झाल्या होत्या. परंतु कर्णानें त्या पुनः सुरू केल्या, हें त्यांस मोठें भूषणावह आहे. व म्हणूनच कर्णाची थोरवी भीष्माहूनही कांकणभर अधिकच आहे.

**कर्णार्जुनांच्या युद्ध-सामुग्रीची तुलना.**

११. शेवटच्या दिवशीं कर्णार्जुनांचें जें युद्ध झालें त्यांत उभयतांची युद्धसामुग्री पाहिली म्हणजे असें दिसतें कीं, कर्णार्जुनांच्या परिस्थीतींत उत्तरदक्षिण ध्रुवांपक्षांही अधिक मोठें अन्तर होतें. नीचतम शल्य कर्णाचा तेजोवध करीत होता, तेव्हां त्रिजगद्गुरु व श्रेष्ठतम वक्ता भगवान् श्रीकृष्ण अर्जुनास धैर्य देत होता; एवढेंच नव्हे, परंतु एकदां धर्माकडून अर्जुनाचा मुद्दाम अपमान करविला, पुढें त्याजकडून आत्मप्रौढी

गावविली व अशा रीतीनें त्याला सर्व बाजूंनीं सजवून श्रीकृष्णांनीं रणभूमीवर पुनरपि आणलें. तो भ्याला असें पाहून रणांतून पळवून मुद्दाम शिबिरांत नेलें. कर्णाची बाजू सगळीकडून लंगडी करण्यांत आली होती. अर्जुनाचें सर्व साहित्य दैवी व अविनाशी होतें. कर्णाचें, याच्या अगदीं उलट होतें. तथापि तो ज्या धैर्यानें टिकाव धरून लढला तें खरोखरी वाखाणण्यासारखें होय. राळेच्या पुतळ्यानें लाखेची तलवार व गवताची काठी हातांत घेऊन कापसाच्या पर्वतांसह अग्नीवर चालून जावें अशीच कर्णानें अर्जुनावर चाल केली होती असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. परंतु अशा स्थितींतही त्यानें ( भिष्मद्रोणांच्यानें पंधरा दिवसांत जें झालें नाहीं तें) अर्जुनास रणांतून पळवून लाविल्याचें कृत्य केलें. हेंच कर्णाच्या अद्वितीय सेनापतित्वाचें निदर्शक होय. कर्णाच्या एकंदर वागण्यावरून तो प्रयत्नवादी होता असें स्पष्ट दिसतें. भवितव्य कांहीं टळत नाहीं म्हणून कांहींही करूं नये असे विचारशून्य निराशावादी लोक म्हणत असतात, त्यांनीं कर्णाच्या चरित्राचें मनन करण्यासारखें आहे.

**विस्मृतीची सर्वसाधारणता.**

१७. कर्णाला मृत्युसमयीं ब्रह्मास्त्राची विस्मृति पडली होती, ती शापानें पडली होती असें दिसतें. परंतु अशीच ब्रह्मास्त्राची विस्मृति द्रोणाचार्यांसही मरणसमयीं पडली होती असें द्रोणपर्वांत लिहिलें आहे. यावरून मरण टळणें शक्य नाहीं हाच सिद्धान्त दृढ होतो. शिवाय मागें जगूनही मौसल पर्वांत अर्जुनाची जी दुर्दशा झाल्याचें लिहिलें आहे तो वाचून, कर्ण मेला हें उत्तमच झालें असें वाटल्यावांचून राहत नाहीं. कृष्णाच्या मृत्यूनंतर त्याच्या बाय-

कांना सुरक्षितपणें हास्तिनापुरीं आणण्यास अर्जुन गेला होता. येतांना वाटेंत दस्यूंनीं व यवनांनीं त्यांना लुटिलें. भारतीयुद्धांतील या वीरप्रवराला या लोकांशीं लढतांना अस्त्रविद्येचें एक अक्षरही आठवलें नाहीं. व म्हणून पराभव पावून त्यांनीं केलेली कृष्ण-स्त्रियांची विडंबना अवलोकन करून कसाबसा हा श्रेष्ठ धनुर्धर हस्तिनापुरांत आला. हें वर्णन मौसल पर्वांत आहे. यानन्तर थोडक्याच दिवसांनीं पाण्डव हें जग सोडून गेले. यावरून असें दिसतें कीं, अन्तसमयीं विस्मृति ही सर्वसाधारण आहे. आतां ही सर्वसाधारण गोष्ट असून ती कर्णास लागू नव्हती, म्हणजे कर्णास कांहीं अशी विस्मृति पडणार नव्हती, असें परशुरामांनीं कर्णाच्या अचाट बुद्धिमत्तेवरून तर्कानें जाणून जर हा शाप दिला असता, तरीही या शापावरून कर्णाच्या धारणाशक्तीच्या अद्वितीयत्वाबद्दल खरोखरी आदरच वाटला पाहिजे. आपल्या स्मरणशक्तीच्या अद्वितीयत्वाची जाणीव खुद्द कर्णासही होती असें दिसतें. कारण त्यानेंही या शापाचा अर्थ असाच केला कीं, जोंपर्यन्त आपणास ब्रह्मास्त्र स्फुरणार आहे तोंपर्यन्त मरण हें येणारच नाहीं, असा श्रीगुरूंचा आपणास वरच आहे.

१३. आतां सरतेशेवटीं ज्या अङ्ग देशाचा कर्ण हा राजा होता, त्याबद्दल दोनच शब्द सांगून प्रस्तुत उपसंहार पूर्ण करीतों. अंग राज्याचा उल्लेख अथर्व वेद ५।२२।४ यांत आहे. रामायणांतही याचें वर्णन आहे. बलिराजाचा पुत्र अंग याच्या नांवावरून या देशाला अंगदेश हें नांव पडलें

असावें, असा कित्येकांचा तर्क आहे. परन्तु रामायणांत या सम्बन्धानें मनोरंजक हकीगत आहे. ती अशी कीं, शंकराच्या तृतीय नेत्रानें मदनाला जाळिल्यावर रतीच्या प्रार्थनेनें त्याला अनंगत्व प्राप्त झालें. पुढें कित्येक वर्षांनीं सरयू आणि भागीरथी या दोन नद्यांच्या मधील प्रदेशांत मदनाला पुनः साङ्गत्व प्राप्त झालें व यावरूनच त्या प्रदेशाला अङ्ग हें नांव पडलें.



# अभिप्राय.

रा. रा. विनायक सदाशिव वाकसकर यांनीं लिहिलेलें 'राधेय-कर्ण-चरित्र' मीं वाचून पाहिलें. रामायण महाभारत ह्या भावनोद्दीपक ग्रंथांतील प्रमुख पात्रांचीं चरित्रें वेगळीं काढून तीं सुसंबद्ध रीतीनें लिहून वाचकांच्या व विशेषतः विद्यार्थ्यांच्या हातांत देणें हें राष्ट्रीय शिक्षणास माझ्या मतें अत्यंत जरूर असून, श्रीराम किंवा श्रीकृष्ण यांच्या चरित्राप्रमाणेंच कर्णाचें चरित्रही मोठें हृदयंगम व बोधकारक आहे. ह्या विषयीं मतभेद होण्याचें कारण नाहीं. वाकसकरांचा पुराणग्रंथांचा व्यसंग फार दिवसांचा व मार्मिक असून त्यांचे लेख अनेक मासिकांच्या वगैरे द्वारानें मराठी वाचकांच्या चांगले परिचयाचे आहेत. विषयाशीं यांचें तादात्म्य असल्यामुळें, कर्ण-चरित्र हें पुस्तक सर्व दृष्टींनीं मनोरम झालें असून तें मुलांमुलींच्या हातांत देण्यास फार लायक आहे. पुस्तक लहान असूनही हल्लींच्या महर्गतेच्या काळांत आश्रयाच्या अभावीं तें बाहेर येऊं शकत नाहीं. वास्तविक ह्या महर्गतेनें पोटाप्रमाणेंच बुद्धीचीही केवढी उपासमार होत आहे ह्याची कल्पना थोड्यांसच असेल. पुस्तक सर्वथैव आश्रयास पात्र आहे.

गोविंद सखाराम सरदेसाई,

बडोदें, ता. १६-७-१९२०

× × ×

रा. रा. वाकसकर यांनीं लिहिलेलें "राधेय-कर्ण-चरित्र" मीं समग्र वाचून पाहिलें. रा. वाकसकर हे उत्तम मराठी लेखक असून, महाभारता-वरील त्यांचा व्यासंग फारच दांडगा असावा, असें या चरित्रावरून स्पष्ट दिसून येतें. कर्णाचें चरित्र फारच निस्पृहतेनें लिहिण्यांत आलेलें आहे. कर्णाचे गुण व अवगुणही या चरित्रांत दाखविण्यांत आले आहेत. उपसंहाराचा भाग फारच छान साधला आहे. चरित्र फारच वाचनीय झालें आहे. नवीन पिढीला या चरित्रापासून पुष्कळ गोष्टी शिकण्यासारख्या आहेत. उत्तेजनाच्या अभावीं, हें पुस्तक आज पांच वर्षांपासून, छापल्या-शिवाय तसेंच पडून राहिलें आहे. अशा होतकरू लेखकास आमच्या येथील विद्याखातें आश्रय देणार नाहीं काय ?

बडोदें, तारीख २२ माहे जुलई सन १९२० } नानासाहेब शिंदे, कर्नल. बडोदा आर्मी.

श्रीजुम्मादादा—व्यायामशाळा—इमारत-फंड.

# विनंति-पत्र.

श्रीयुत रा. रा.

प्रेमपूर्वक साष्टांग नमस्कार विनंति विशेष. श्रीजुम्मादादा-व्यायाम-शाळा ( बडोदें ) ही संस्था आपलें देशसेवेचें अंगीकृत कार्य आज जवळ जवळ चाळीस वर्षें सतत करीत आहे. परंतु, आजपर्यंत या संस्थेस स्वतःच्या मालकीची इमारत अशी मुळींच नव्हती. या संस्थेंत १ व्यायामगृह, २ क्रीडाभवन व ३ वसतिगृह असे तीन भाग आहेत हें जगत्प्रसिद्धच आहे. या तीनही भागांची व्यवस्था पृथक्पणेंच केलेली आहे. या तीनही शाखा एका भव्य जागेंत सुव्यवस्थितपणें करितां येतील व अशी एखादी विशाल इमारत संस्थेच्या मालकीची असावी या इच्छेनें प्रयत्न सुरू केला आहे.

आपल्या पौर्वात्य व्यायामकलेचें पुनरुज्जीवन करणें, मर्दानी व मैदानी खेळ नवीन पद्धतीनें सुरू करणें आणि शरीरसंवर्धनासाठीं तौलनिक पद्धतीनें शिक्षण देणें अशी तिहेरी कामें या संस्थेमार्फत होत असतात. प्राथमिक, माध्यमिक आणि उच्च यांपैकीं कोणतेंही शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांस आमच्या स्वतःच्या देखरेखीखालीं असलेल्या वसतिगृहांत ठेवून सदाचाररत करण्याच्या कामांत आम्हांस बरेंच यश आलें आहे हें बहुश्रुत आहेच.

याप्रमाणें आमच्या संस्थेंत अनेकविध होणाऱ्या कामासाठीं मालकीच्या इमारतीची खास आवश्यकता आहे. श्री. विजयसिंहजी विठ्ठलराव खासगी-वाले यांनीं बडोदें येथील दांडयाबाजारांतील ६०० × ३००ची स्वतःच्या मालकीची विस्तीर्ण मोकळी जागा आंतील बंगला व विहीर यासुद्धां या संस्थेस ९९ वर्षांच्या पटयानें कृपाळूपणें दिली आहे. त्याचप्रमाणें, इमारतीच्या फंडासाठीं श्री. जुगलकिशोर बिरला यांनीं सहा हजार रुपयांची

देणगी दिली आहे, व श्री. श्रीपाद रामचंद्र जाग यांनीं एक हजार रुपयांची प्रॉमिसरी नोट संस्थेस अर्पण केली आहे.

आमच्या कल्पनेप्रमाणें इमारतीसाठीं सुमारें एक लाख रुपयांचा फंड लागेल. तरी दानशूर महात्मे या प्रसंगीं आम्हांस पूर्ण साहाय्य करतील अशी आम्हांस आशा आहे. आमची संस्था उदारधी दात्यांची नेहमीच उपकृत असते हें निराळें सांगण्याची आवश्यकताच नाहीं.

श्रीजुम्मादादा व्यायाम शाळा, बडोदें. } आपला, माणिकराव.